# कोसबाडच्या
# अनुताई वाघ

प्रा. मंगला गोखले



## अनुताई वाघ जीवनपट

| | |
|---|---|
| १७-३-१९१० | जन्म, मोरगाव, पुणे. (वडील - बाळकृष्ण वाघ, आई - यमुनाबाई वाघ) |
| १९२५ | व्हर्नाक्युलर फायनल परीक्षेत नाशिक जिल्ह्यात प्रथम |
| १९२९ | प्राथमिक शिक्षण प्रमाणपत्र पी.टी.सी. परीक्षेत पुणे विभागात सर्वप्रथम |
| १९२९-३३ | चांदवड पिंपळगांव (नाशिक) येथे प्राथमिक शिक्षण मंडळात शिक्षिका |
| १९३३ - ४४ | पुण्याच्या हुजूरपागेत प्राथमिक शाळेत शिक्षिका |
| १९३७ | रात्रशाळेतून मॅट्रीक परीक्षा उत्तीर्ण |
| १९४५ | ताराताई मोडक यांची गुरुभेट. बोरीवली- येथे आयोजित कस्तुरबा ट्रस्ट बालसेविका प्रशिक्षण शिबिरात दाखल. |
| १९४५ - ५६ | ताराताई मोडक यांचे समवेत बोर्डी येथे ग्राम बाल शिक्षा केंद्राच्या कार्यात सहभागी |
| १९५६ - ७३ | ग्राम बाल शिक्षा केंद्राच्या व्यवस्थापिका पदाची जबाबदारी |
| १९६१ | दोन्ही डोळ्यांत मोतीबिंदू असूनही एस. एन. डी. टी. विद्यापीठाची बी.ए. परीक्षा उत्तीर्ण |
| १९७२ | आदर्श शिक्षिका राज्यस्तरीय पुरस्कार |
| १९७३ - ९२ | ग्राम बाल शिक्षा केंद्राच्या संचालिका पदाची जबाबदारी |
| १९७४ - ९२ | शिक्षण पत्रिकेच्या संपादक पदाची जबाबदारी |
| १९८० | मुक बधिर शाळेची डहाणू येथे स्थापना |
| १९८१ | महिलांसाठी सावित्री मासिकाची सुरुवात |
| १९८२ | ग्राम मंगल संस्थेची स्थापना |
| १९८४ | "पद्मश्री" पदवी देऊन भारत सरकार द्वारा गौरवान्वित |
| १९८५ | जमनालाल बजाज पुरस्कार |
| १९८९ | एस.एन.डी.टी. विद्यापीठ पुणेकडून आपल्या माजी विद्यार्थिनीचा डी.लिट पदवी देऊन गौरव केला. |
| २७-९-१९९२ | मृत्यू कोसबाड हिल् |

किंमत २०रु.

# कोसबाडच्या अनुताई वाघ

प्रा. मंगला गोखले

प्रकाशक :

ग्राम बाल शिक्षा केन्द्र,

कोसबाड, ता. डहाणू, जि.ठाणे

२७ सप्टेंबर २०१३

मुद्रक : विकासमुद्रणालय, कोसबाड

किंमत : २० रुपये

## कोसबाडच्या अनुताई वाघ

शाळा म्हणजे टोपलीभर गृहपाठ.
शाळा म्हणजे, गडबड, गोंगाट
शाळा म्हणजे गणवेशाची कटकट.
शाळा म्हणजे सात तासांची कैद.
शाळा म्हणजे अभ्यास.
शाळा म्हणजे मित्रमैत्रिणींची धम्मालऽऽ.

कॅलिडिओस्कोप फिरवून, काचेतून पाहिले की, वेगवेगळ्या आकृत्या दिसतात, आकार दिसतात, तसं जसं पहावं तशी ही शाळा दिसते.

मुलांनो, तुमचा शाळेचा अनुभव कसा'! - यावर तुम्ही ठरवता, शाळा चांगली की वाईट! लहानपणी शाळा म्हणजे वॉटरबॅग, खाऊचा डबा- असं समीकरण असतं, पण मोठ्ठं झाल्यावर मात्र, वर सांगितल्याप्रमाणे किंवा दप्तराचे ओझं वाहणारा गाढव अशी शाळेच्या विद्यार्थ्यांची अवस्था असते.

- खुदकन् हसलात ना! पटली ना अगदी खूण. पक्की!

- याला कारण अभ्यास म्हणजे वह्या आणि वह्या म्हणजे वर्गपाठ, गृहपाठाची नुसती खर्डेघाशी.

बाई बोलतात, बाई सांगतात म्हणून तुम्ही अभ्यास करता. शिकायचं, शिकून शहाणं व्हायचं म्हणून तुम्ही काय करता? ज्ञानाची गंगा तुमच्या दाराशी वाहते तरी तुम्हाला अभ्यासाचा कंटाळा. पण आपल्या देशात अशी कितीतरी माणसं आहेत की, ज्यांना शिक्षणाचा

गंध नाही. शिकण्यासाठी शाळा परवडत नाही. वह्या-पुस्तकांना पैसे नाहीत. रोजची खायची, पोट भरायची पंचाईत, तिथे शाळेत कुठे येणार! शाळेत यायला या आदिवासी मुलांना वेळ नाही, पैसा नाही, कपडे नाहीत, पोटभर अन्न नाही. शिक्षण नाही म्हणून ज्ञान नाही, आणि ज्ञान नाही म्हणून परावलंबी जिणं. फसवणूक आहे.

देशाच्या कानाकोपऱ्यात, डोंगरकपारीत, खेड्यापाड्यात राहणाऱ्या या आदिवासी माणसांना, माणूस म्हणून जगता येत नाही. अशांची मुलं शाळेत येत नाहीत, शिकत नाहीत - म्हणून त्यांना दोष द्यायचा का?

- अजिबात नाही.

- पर्वत महंमदाकडे येत नाही! मग महंमदाने पर्वताकडे जायला हवं. विद्यार्थी शाळेत नाहीत ना, मग शाळा विद्यार्थ्यांच्या दारात न्यायला हवी. म्हणायला सोपं, पण आचरणात आणायला कठीण.

पण हे कठीण काम, आपल्या महाराष्ट्रामध्ये करून दाखविणारी, ताराबाई मोडक आणि अनुताई वाघ यांच्यासारखी थोर मंडळी आहेत.

'मुलं शाळेत येत नसतील तर शिक्षकांनी मुलांच्या अंगणात शाळेचं झाड लावायला हवं.' - हे अनुताईंचं तत्त्वच आहे.

हे तत्त्व आचरणात आणण्यासाठी अनुताईंनी काय काय केलं हे आज आपण जाणून घ्यायचं आहे.

आयुष्यामध्ये खूप कठीण प्रसंग आले की, एकतर माणूस हतबल होऊन गळून जातो. नाहीतर खूप सहनशीलपणे, धीराने आल्या प्रसंगाला तोंड देतो. आपल्या वाट्याला दान कमी आलं तरी, न कुरकुरता, स्वतःच्या आयुष्याबरोबरच, या बोर्डी कोसबाडच्या परिसरातील आदिवासी मुलांचं आयुष्य अनुताई वाघ यांनी आपल्या



कर्तृत्वाने बदलून टाकलं. यामागे प्रेरणा होती ती बाल शिक्षण केंद्र, कोसबाड या संस्थेच्या आद्यप्रणेत्या, संचालिका, पूज्य, पद्मभूषण ताराबाई मोडक यांची.

१९१० मध्ये जन्मलेल्या अनुताई वाघ यांच्या आईवडिलांनी काळाच्या पुढे दोन पावले टाकून, शिक्षणाचं महत्त्व ओळखलं. या बालविधवा अनुला आपल्या छोट्या मुलीला शाळेत घातलं. हे त्या काळातलं म्हटलं तर धाडस, पुरोगामित्वच होतं.

१७ मार्च १९१० साली, पुणे येथे अनुताईंचा जन्म झाला. पुणे जिल्ह्यातील बारामती तालुक्यातील मोरगावचे हे वाघ घराणे. वाघ मंडळी निःसीम गणेशभक्त. अनुताईंचे वडील बाळकृष्ण धुंडीराज वाघ. त्यांना 'आबा' म्हणत असत. स्वभावाने ते शांत आणि प्रेमळ. अनुताईंना तीन बहिणी आणि एक भाऊ. अनुताई पहिली मुलगी. त्यामुळे घरामध्ये त्यांचे लाड झाले. सगळीजण लहानपणी अनुताईंना 'पप्या' या लाडक्या नावाने हाका मारीत असत. अनुताईंच्या आईने संसार अतिशय हुशारीने, हिंमतीने केला. कामानिमित्त मुलींच्या शाळा तिने कधीच बुडविल्या नाहीत अथवा शाळेला उशीर होऊ दिला नाही. मुलींनी शिकून काय करायचे? चुलींशीच बसायचे ना! असा विचारही तिने कधी केला नाही. वयाच्या १३ व्या वर्षी, १९२३ साली, पुणे येथे शंकर वामन जातेगावकर यांच्याशी अनसूया (अनुताई) वाघ यांचा विवाह धुमधडाक्यात झाला. वरातीच्या दिवशी सासरी गेलेल्या अनुताई वय लहान म्हणून माहेरी राहिल्या. जातेगावकर नोकरीच्या गावी राहिले. पण विधिलिखित वेगळे होते. दिवाळसण थाटात पार पडला पण दिवाळीनंतर एका आठवड्यातच जातेगावकरांचे, रेल्वे इंजिनाचा धक्का लागून निधन झाले. तेव्हा अनुताईंचे वय होतं फक्त साडेतेरा वर्षे. संसार म्हणजे काय हे कळण्याअगोदरच संसाराचा पट उधळला. या दुःखद घटनेनंतर, एक

दिवस श्रीमती दुर्गाबाई नेने-खरे उर्फ माई या शिक्षिका अनुताईंच्या आईला भेटायला आल्या. तेव्हा म्हणाल्या, 'जावयाच्या दु:खाने रडत बसू नका. मुलीला शिकवा.' नुसता कोरडा उपदेश केला नाही तर स्वत:बरोबर या छोट्या बालविधवा अनूला, विदर्भातील अकोला येथे शिक्षणासाठी घेऊन गेल्या. लेखन, वक्तृत्व याशिवाय राष्ट्रीय वृत्तीचे सर्वांगीण संस्कार माईंनी अनुताईंवर केले. वैधव्यानंतरच्या या शिक्षणालाही आईने पाठिंबा दिला. एवढेच नव्हे तर फायनलच्या परीक्षेसाठी वेळीच काळजी घेतली. त्यामुळे शिक्षणात खंड पडूनसुद्धा १९२५ मध्ये, इगतपुरीच्या मुलींच्या शाळेच्या मोठ्या बाईंनी, अनुताईंना व्ह.फा. परीक्षेस बाहेरून बसविण्याची जबाबदारी घेतली. अनुताईंनी झटून अभ्यास केला. नाशिक केंद्रात परीक्षेसाठी गेल्या. निकाल लागला तर व्हर्नाक्युलर फायनल परीक्षेत, नाशिक जिल्ह्यात, अनुताईंचा नंबर पहिला आला होता. आता ट्रेनिंग कॉलेजमध्ये प्रवेश मिळविण्यासाठी खटपट करायला, आईने वडिलांच्या मागे तगादाच लावला. १९२९ मध्ये, वयाच्या १६ व्या वर्षी अनुताईंनी, पुण्यातील कॅम्प विभागातील लाल देवळाजवळच्या वुइमेन्स ट्रेनिंग कॉलेजात प्रवेश घेतला. १९२६ पर्यंत एकूण तीन वर्षांचे ट्रेनिंग पुरे केले. या प्राथमिक शिक्षण प्रमाणपत्र (पी.टी.सी.) परीक्षेतही अनुताई, पुणे विभागातील, सर्वप्रथम आल्या.

अनुताईंच्या आईने आपल्या बालविधवा मुलीच्या शिक्षणासाठी, वडिलांमागे तगादा लावला नसता, डोळसपणे मुलीच्या शिक्षणाचा विचार केला नसता तर अनुताई म्हणतात,

''मी कुठेतरी पोळ्या लाटत बसले असते.' – पण घडायचे वेगळेच होते. स्वत:चा नाही तर नाही पण समाजसंसार मात्र अनुताईंनी धडाडीने नेटाने केला.

एकूणच अनुताईंना अभ्यासाची ओढ विलक्षण. खेडेगावातून



पुण्यासारख्या शहरात शिकण्यास आल्यावरसुद्धा, त्यांनी सहामाही परीक्षेत सर्व विषयात पहिल्या क्रमांकाचे गुण मिळविले होते. निबंधात तर त्यांना पैकीच्या पैकी गुण मिळत असत. वक्तृत्व, नाट्य, खेळ या सगळ्यातच त्या भाग घेत असल्याने, शिक्षकांच्या त्या लाडकी, आवडती विद्यार्थिनी होत्या.

अनुताईंचा शिकण्याचा सोस इतका दांडगा की ट्रेनिंगच्या वर्षी परीक्षेसाठी, भूगोल विषयाला पुस्तक नव्हते. गुरुजींनी या विषयाच्या नोट्स तयार केल्या होत्या. पण त्या १९ विद्यार्थिनींच्यात फिरून, स्वत:कडे यायला वेळ लागणार, मग अभ्यास केव्हा होणार? म्हणून गुरुजी वर्गात बोलत असताना, त्यांच्या तोंडून निघणारा शब्द अन् शब्द अनुताई लिहून घेऊ लागल्या. पण लिहिण्याचा देवनागरीचा वेग कमी पडू लागतोय, असं लक्षात आल्यावर, अनुताईंनी काय करावं?- चक्क मोडीत लिहिण्यास सुरुवात केली आणि भूगोल विषयाची वही मोडी लिपीत तयार करून टाकली.

अनुताईंना लहानपणी फारशी जमायची नाही अशी गोष्ट म्हणजे चित्रकला आणि शिवणकाम. परंतु शिकण्याची जिद्द, चिकाटी इतकी दांडगी की शेवटी शेवटी याही विषयात अनुताईंनी छान गुण मिळविले.

१९२९ साली अनुताई प्राथमिक प्रमाणपत्र परीक्षा उत्तीर्ण झाल्या. १९३० पासून, नाशिक जिल्ह्यातील चांदवड येथील, जिल्हा लोक बोर्डामार्फत चालविल्या जाणाऱ्या शाळेत, त्या मुख्याध्यापिका म्हणून काम पाहू लागल्या.

-'मुलींना शिकवून काय करायचे!- शेतकरी वर्गातील मुली तर शेतावर काम करायला जायच्या. त्यांनी शिकून काय करायचे!-' असं वाटण्याचा स्त्रीशिक्षणाच्या उदासिनतेचा तो काळ होता. त्यामुळे मुलींना शाळेत बोलावून आणावे लागे. अनुताई बालविधवा, तरुण आणि तरीही समवयस्क मित्रांच्यात बिनधास्त वावरत असत. 'पण

आपलं मन आणि विचार स्थिर आणि परिपक्व असतील आणि ध्येयवादाची वाट पायाखाली असेल तर माणसाची पावले डळमळत नाहीत' असा अनुताईंचा अनुभव आहे. स्त्री-पुरूष विशुद्धमैत्री असताना, ओळख करून देताना- 'हे माझे मित्र'- असंच अनुताई सांगायच्या उगीच कुणाला 'भाऊ' म्हणून सांगण्याचा ढोंगीपणा त्यांनी केला नाही. इतके त्यांचे विचार स्वच्छ आणि पुरोगामी असे आहेत. ही गोष्ट आजच्या काळातही लक्षात घेण्यासारखी आहे.

१९३३ मध्ये अनुताईंनी पुण्याच्या प्रसिद्ध हुजूरपागा शाळेत नोकरी धरली. तिथे तेरा वर्षे काम केलं. शाळेचं वाचनालय, वार्षिक समारंभ इतर कार्यक्रम इ. सगळी कामे अनुताईंकडे असत. या विविध कार्यक्रमांच्या निमित्ताने अनुताई स्वतःच संवाद, अभिनयगीते लिहीत असत. या लेखनाच्या आधारेच पुढे त्यांनी 'बालसंवाद' नावाची एक छोटी पुस्तिका पुढे काढली. या हुजूरपागा शाळेच्या वाचनालयातच अनुताईंनी कै. ताराबाई मोडक यांचे 'शिक्षण-पत्रिका' हे मासिक प्रथमच पाहिले. त्यांना ते खूप आवडले. मग 'मधुमक्षिका' या टोपणनावाने त्या मासिकात काही लेखन करण्यास त्यांनी सुरुवात केली.

याच सुमारास पूना नाईट हायस्कूलच्या शाळेत, नाव घालून रात्री ७ ते ११ शाळा शिकून, एकीकडे हुजूरपागेत नोकरी करून १९३७ मध्ये अनुताईंनी मॅट्रिकची परीक्षा दिली आणि ५५% गुण मिळवून त्या यशस्वी झाल्या. त्यानंतर वयाच्या ५१ व्या वर्षी १९६१ मध्ये दोन्ही डोळे मोतीबिंदूने अधू असूनही त्या बी.ए. ची परीक्षा दुसऱ्या वर्गात उत्तीर्ण झाल्या. अधू डोळ्यांनी अनुताईंनी पेपर कसे लिहावेत! 'कागदाजवळ डोळे नेऊन, पहिली ओळ बघून रेषेवर बोट धरीत त्यांनी लिहायला सुरुवात केली. नंतर दरवेळेस बोटाचे अंतर घेत घेत. पुढच्या ओळीवर त्या लिहित राहिल्या.' - अशी ही जिद्दीची



चित्तरकथा बी.ए.च्या परीक्षेची.

कस्तुरबा राष्ट्रीय निधीमार्फत खेडेगावात महिला आणि बालसेवेची कामे सुरू व्हायची होती. त्यासाठी प्रत्येक राज्यात अध्यापन-केंद्र निघायचे होते. त्याची पूर्वतयारी म्हणून १९४५ च्या मार्चमध्ये बोरिवली-मुंबई येथे आखिल भारतीय स्वरूपाचे एक शिबिर होते. हुजूरपागेतील मानाची नोकरी सोडून देऊन, खटपटीने या शिबिरात, अनुताईंनी प्रवेश मिळविला. पुण्यातील निवान्त नोकरी सोडण्याचा हा निर्णय, फारसा कुणालाच आवडण्यासारखा नव्हता. तरीसुद्धा हिमतीने, बोरिवलीच्या शिबिराला त्या गेल्या. तेथे पूज्य ताराताई मोडक यांच्याशी गाठ पडली आणि अनुताईंच्या जीवनप्रवाहाला एक नवे-अगदी नवे-वेगळे वळण लागले.

खेडेगावात, मागास विभागात- 'बालवाडी कशी चालवावी'- याचा प्रयोग ताराबाईंनी मुंबईच्या एका मागास वस्तीतील कॉलनीत सुरू केला होता. त्यांनीच बोरिवली शिबिरात बालवाडीबाबत मार्गदर्शन केले. यावेळेस ताराबाईंनी अनुताईंना विचारले,-

"पालघरजवळच्या खेडेगावात बालवाडी चालवायचा प्रयोग सुरू करायचा आहे.- या प्रायोगिक शाळेत काम करणे तुम्हाला आवडेल का?"

अनुताईंनी लगेच हो म्हटले.

ताईंनी विचारले, 'पगार किती घेशील?'

त्यावर अनुताई म्हणाल्या-

'मला घरून काही मागवायचे नाही आणि घरी काही पाठवायचे नाही. दोन वेळेला पोटाला आणि वस्त्र मिळालं की पुरे.'

त्यावर ताईंनी ४५ रुपये पगार देऊ केला. हे काम नूतन बाल शिक्षण संघातर्फे चालायचे होते. तेव्हा सप्टेंबर १९४५ मध्ये कामाची पूर्वतयारी करून तेवण्यासाठी आपल्या आधी दोन महिने

एक आघाडीची तुकडी पुढे बोर्डीला पाठवून दिली. या उत्साही तुकडीच्या एकमेव सभासद होत्या अनुताई वाघ, आणि खऱ्या अर्थाने अनुताईंच्या बोर्डी-कोसबाड येथील शैक्षणिक-सामाजिक कार्याला प्रारंभ झाला. बोर्डी गावाची प्राथमिक पाहणी करणे, मुले कोणत्या भागात, कोणत्या संख्येने मिळतील याचा अंदाज घेऊन कार्यविभाग निश्चित करणे, केंद्रासाठी व राहण्यासाठी योग्य अशी जागा हुडकून ठेवणे. गावातील लोकांशी परिचय करून घेऊन त्यांना आपल्या कार्याची कल्पना देणे. त्यांचे सहकार्य मिळविणे, दूध, भाजीपाला इत्यादी गोष्टींची जुळवाजुळव करणे अशी कामे अनुताईंवर सोपविण्यात आली होती.

अनुताईंमधला 'वाघ' कामाला लागला!

आठवड्यातले पाच दिवस अनुताई फिरून, भटकून माहिती मिळवत व शनिवार-रविवार बोर्डीचे काम पाहत. मिळाली तर बैलगाडी, दिसला तर टांगा, नाहीतर मग पायीच अनुताईंचे फिरणे चालू असायचे.

ताराबाईंच्या कसोट्यांवर पूर्णपणे, सर्वार्थाने उतरणाऱ्या एकमेव शिष्या म्हणजे अनुताई.

अनुताईंनी या बोर्डीचा परिसर विंचरून काढला. सारा तपशील टिपून ताराबाईंना सादर केला.

आणि बोर्डी येथील हे कार्य 'कोसबाड'ला हलविण्यात आलं.

आपल्या शैक्षणिक प्रयोगाला योग्य अशी बोर्डीपासून सुमारे पाच मैल अंतरावर असलेली जुम्मा जंगलातली एक टेकडी त्यांनी पसंत केली. डहाणू तालुक्यात कोसबाड नावाचे एक आदिवासी उपखेडे होते. वीज, पाणी, रहदारीचे रस्ते, दळणवळणाची साधने सर्वांचाच अभाव होता. परंतु या परिसरात आदिवासींच्या आठ पाडे-वस्त्या होत्या. त्यामुळे बालवाडीच्या वयाची सुमारे शंभर तरी मुले येथे



शाळेसाठी मिळणार होती. म्हणूनच हे उपखेडे 'कोसबाड' ही आदिवासींच्या शिक्षणाची कार्यभूमी म्हणून निश्चित करण्यात आली.

१९४५-१९७३ या कालावधीत संस्थेचे काम आणि संस्थेची व्याप्ती वाढविण्याच्या कामात ताराबाईंना अनुताईंनी सहकार्य दिले. ताराबाईंच्या निधनानंतर १९७३ मध्ये त्या संस्थेच्या संचालिका झाल्या.

साध्या बालवाडी शिक्षिका म्हणून, 'ग्राम बाल शिक्षा केंद्रात' आलेल्या सेवाव्रती अनुताई आज संस्थेच्या संचालिका म्हणून काम करीत आहेत.

२४ डिसेंबर १९४५ रोजी माननीय बाळासाहेब खेर यांच्या हस्ते बोर्डी येथे 'ग्राम बाल विकास' केंद्राचे उद्घाटन झाले. त्यावेळी सुरुवातीला खेडेगावातील बालवाड्या, शास्त्रीय पद्धतीने, पण कमी खर्चात कशा चालवाव्यात हा प्रयोग करणे एवढं एकच उद्दिष्ट नूतन बाल शिक्षण संस्थेच्या डोळ्यासमोर होते.

आज इतक्या वर्षांच्या अथक परिश्रमानंतर 'ग्राम बाल शिक्षण केंद्राने' ग्रामीण बाल शिक्षण, आदिवासी शिक्षण, प्रौढ शिक्षण शाळा आणि व्यवसाय शिक्षण-शैक्षणिक साधने तयार करणे - अशा अनेक गोष्टींमध्ये प्रयोगात्मक काम करून महत्त्वाची पायाभूत कामगिरी केली आहे.

बालवाडी, अंगणवाडी, विकासवाडी, कुरणशाळा, राजशाळा, उद्योगवर्ग, कार्यानुभव प्रकल्प अशी अनेक कामे या ठिकाणी अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीत होत राहिली. भावनगर येथील श्री. गिजूभाई बधेका यांच्या बाल शिक्षणातील नव्या उपक्रमाने प्रभावित झालेल्या ताराताईंची जिद्द, यशस्वी मार्गदर्शन, मॉंटेसरी शिक्षण पद्धतीचा आवश्यक तेवढा आधार, अनुताईंचे अथक परिश्रम, चिकाटी आणि कार्यकर्त्यांचे सहकार्य यामुळे 'इवलेसे रोप लावियले

दारी' आता 'तिचा वेलू गेला गगनावरी' असे स्वरूप या संस्थेला आले आहे.

अनुताईंनी आयुष्यात वेळेचं महत्त्व फार मानलं. जिभेवर, चित्तवृत्तीवर कमालीचं नियंत्रण ठेवलं. अध्यापकांचे लेखन तपासताना चांगले काय ते त्या अगोदर सांगत, चूक मागून सांगावी, हे त्यांचे धोरण.

अभ्यासाव्यतिरिक्त, निसर्गनिरीक्षण, वाचन, पत्रलेखन असे अनेक छंद छोट्या अनुला होते. ते आज अनुताईंमध्ये आहेत. आलेल्या प्रत्येक पत्राला अनुताई उत्तर लिहिणारच. त्यांच्यालेखी लहान-मोठा असा तरतमभाव नाही. अनुताईंना कोसबाडला भेटायला एखादा मोठा अधिकारी येवो अथवा सामान्य व्यक्ती येवो. त्या सगळ्यांना सारख्याच तोलमोलाने भेटतात.

जो न्याय इतरांना तोच न्याय त्यांच्या सहकाऱ्यांबाबतही त्या लावतात. 'लहान-मोठा', 'उच्च-नीच' हा विचारच त्यांच्या मनाला शिवत नाही. या संदर्भातील एक आठवण सांगत असताना सिंधुताई म्हणाल्या,

''सावित्रीबाई फुले पुरस्कार' १९८१ मध्ये प्रथमच दिला जाणार होता. तो प्रथम पुरस्कार अनुताईंना मिळाला. समारंभ होता मुंबईला.

अनुताईंबरोबर सिंधुताई आणि आणखी एक सहकारी होत्या. मुंबईला पोहचल्यावर उतरवून घ्यायला, बॅ. अंतुले इ. मोठी मान्यवर मंडळी आलेली होती. अनुताईंची उतरायची व्यवस्था अगदी चोख ठेवण्यात आली होती. पण आम्हा दोघींची व्यवस्था इतरत्र करण्यात आली होती.'' सिंधुताई म्हणाल्या,

''अनुताईंना 'ही' व्यवस्था समजली. लगेच अधिकाऱ्यांना त्या म्हणाल्या, 'या दोघी माझ्या सहकारी आहेत. त्या जिथे राहतील



तिथे मी राहीन. अर्थातच आम्हा सर्वांचीच व्यवस्था अनुताईंबरोबर करण्यात आली. हे सांगायला नकोच-'' सिंधुताईंची अवस्था 'किती किती सांगू तुला!' अशी झाली होती.

शिर्डीच्या प्रवासातील एक आठवणही अनुताईंच्या चोख स्वभावाची, सहनशीलतेची प्रत्यय देणारी आहे. एस.टी.च्या बऱ्याच तासांच्या प्रवासात अनुताईंच्या पायाला सूज आली. त्यावर 'समोरच्या सीटवर थोडावेळ पाय ठेवायला हरकत नाही' असं सिंधुताई त्यांना म्हणाल्या. त्यावर सहनशील, शिस्तीच्या अनुताई म्हणाल्या,

''दुसऱ्याची सीट आपण कशी अडवायची! बसायच्या जागेवर पाय कसा ठेवायचा!''

नवशिक्या आदिवासी तायाने बनविलेली बेचव पालकाची पातळ भाजी, अनुताई चविष्टपणे ओरपून खातात. हे तर त्यांच्या कमालीच्या सहनशीलतेचं द्योतक आहे. पण आता मात्र ताया वाढाण एकदम सुग्रण, सुगृहिणी दोन मुलींची माता झाली आहे. बालवाडी शिक्षिका बनली आहे.

अनुताईंना एकदा विषारी साप चावला. वेळ रात्रीची. सगळीकडे निजानीज झालेली. ताराताईंची झोपमोड होऊ नये, म्हणून रात्रभर अनुताई - 'हूं की चूं' न करता, तळमळत बाहेरच बसून राहिल्या. नंतर सहा महिने हे दुखणं अनुताईंना पुरलं.

विलक्षण सोशिकता, ताराताईंविषयीची कमालीची गुरुभक्ती, चोख वर्तन, कार्यावरील, माणसावरील गाढ श्रद्धा आणि प्रेम अनुताईंच्या कार्याला मोठेपण देऊन गेलं.

१० जून १९५७ रोजी सगळी संस्था, बोर्डीहून कोसबाडला आली. कोसबाड हा सुद्धा पाडाच. महाराष्ट्रात ठाणे जिल्हा. ठाणे जिल्ह्यातील डहाणू तालुका. डहाणू तालुक्यातील कैनाड गावचा,

कोसबाड हा पाडा.

पाडा म्हणजे वीस ते पंचवीस झोपड्यांचे गाव. या पाड्यांची नावे तरी किती गंमतीची! भोनरपाडा, नारळीपाडा, घाटाळपाडा, वरईपाडा, मानकरपाडा आणि कोसबाड सुद्धा पाडाच.

या कोसबाडलाही बालशिक्षणाचे कार्य सुरू झाले. बाल शिक्षणाच्या प्रसारासाठी मराठी 'शिक्षण पत्रिका' ताराताईंनी १९३३ साली सुरू केली. बालकांसाठी शिक्षकांसाठी आणि पालकांसाठी अजूनही चालू असलेल्या या शैक्षणिक मासिकाच्या १९७१ पासून आजतागायत, अनुताई संपादिका म्हणून काम पाहत आहेत.

'लिहिणे, वाचणे शिकणे म्हणजे केवळ शाळा नाही तर ठराविक वयात ठराविक मानसिक बौद्धिक शक्तींचा विकास होत असतो. त्याला वाव देणे म्हणजे शिक्षण.'

आज तुम्ही शाळेत जाता. शिक्षक शिकवितात. इतक्या दोन वाक्यात या शाळेचं वर्णन करता येणं शक्यच नाही. इतके या शाळेचे स्वरूप वेगळे आहे. या शाळेच्या विकासासाठी अनुताईंनी आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी अफाट परिश्रम घेतले आहेत. कारण

'भीत नाही वाघाला
भीत नाही सिंहाला
भितो एका पांढऱ्या रुपड्याला'
तो कोण?
ओळखा पाहू!

हा तर आदिवासी. शहरातल्या पांढरपेशा माणसाला घाबरणारा, जंगल, दऱ्याखोऱ्यात भटकणारा, हा मुक्त आदिवासी माणूस. यांच्या मुलांना शाळेकडे वळवायचं म्हणजे फार मोठ्ठं काम. मग शिक्षिकेचं पहिलं काम काय!

तर या आदिवासी मुलांना शाळेसाठी बोलावून आणणं. त्यांना स्वच्छ करणं, उवांचे, खरजेचे औषध देणं. न्हाऊ घालणं आणि मग त्यांना त्यांच्या पाड्यावर पोहोचवणं ही सगळी कामं शिक्षिकेला करायला लागायची.



शिक्षकांनी कमरेवर हात ठेवून, मुकादमासारखे 'हे करा' 'ते करू नका.' असे नुसते आज्ञार्थी हुकूम या शाळेत सोडून चालत नाहीत. त्या ऐवजी शिक्षक स्वत: कामास लागले तर मुले, कार्यकर्ते सर्वजण आपोआप काम करू लागतात. हे दृश्य या संस्थेत आपल्याला पहायला मिळते. एकदा अनुताईंची सूचना निघाली, 'रविवारी टाकळा मोहीम करायची ही.-'

पावसाळ्यात टाकळ्याची रोपं सर्वत्र खूप वाढायची. भात रोपणापूर्वी ती काढायची, सूचना काढल्याबरोबर अनुताई सर्वात पुढे.

तत्त्व हे आचरणासाठी असतं. हे गृहीतत्त्व होतं.

एकदा ताराताई म्हणाल्या की, 'गोपुरी संडासाचे खत शेतीवाडीत गेले पाहिजे. नोटीस वगैरे न काढता, अनुताई आणि अप्पा कोसके संडास सफाईच्या कामाला लागले. संडास रिकामे झाले. खत शेतीवाडीत गेले. अनुताईंचा बाणाच आहे-'आधी केले मग सांगितले.' अनुताई अशा कामाला लागल्या की सगळ्यांना आपोआप कामाला उत्साह येतो.

१९४५ ते १९५६ या बारा वर्षांच्या काळात अनुताई बोर्डीत होत्या. त्यांच्या सामाजिक कार्याचा प्रारंभ पू. ताराताईंच्या मार्गदर्शनाखाली येथेच सुरू झाला. तो १९५७ मध्ये कोसबाडलाही चालूच आहे. नू. बा. शि. संघाला जोडलेल्या बालमंदिरांना भेट देऊन मार्गदर्शन करणे, त्यायोगे बालमंदिराची गुणवत्ता वाढविणे, त्यादृष्टीने शाळांची पाहणी करणे, चालक-पालकांच्या अडचणी समजून घेणे, शक्य त्या उपाययोजना सुचविणे, - अशा सर्व प्रकारच्या कामाचा अनुभव याठिकाणी अनुताईंना मिळाला. गुजरातमधील गिजूभाई

बधेकांच्या प्रेरणेने चाललेल्या बालमंदिरांचे निरीक्षण करण्याची संधी, अनुताईंना येथेच मिळाली. बालशिक्षणाच्या नव्या कल्पनेची, नव्या दृष्टीची जवळून ओळख झाली. बोर्डीला आल्यावर अनुताई धडाकून कामाला लागल्या. पण अनाहुतपणे स्पृश्य-अस्पृश्य प्रश्न शाळांतून उभा राहिला.

गावातील हरिजनवाड्यातील मुले, शाळेत एकत्र खेळविण्यासाठी विचारपरिवर्तनाचे अवघड काम पुढे येऊन उभे राहिले. त्यातूनही ही हरिजन मुले अस्वच्छ. त्यामुळे 'मुलांची स्वच्छता' हाच ग्रामीण बालवाडीतला पहिला कार्यक्रम म्हणून निश्चित केला गेला. त्यासाठी मुलांच्या वेण्या-फण्या, उवांचे औषध, आंघोळी, कपडे धुणे इ. सोय करावी लागली. लाइफबॉय साबण लावून आंघोळ करायची, मुलांनी एकमेकांपुढे बसून पाठी धुवायच्या, मोठ्या भावंडानी लहान भावंडाना आंघोळ घालायची. सोडा साबणाच्या गरम पाण्यात, त्या मुलांचे कपडे भिजवायचे, धुवायचे. मुलांचे हात पोहोचतील अशा उंचीवर दोऱ्या बांधून त्यावर मुलांनी कपडे वाळत घालायचे. असा हा स्वच्छतेचा पाठ चालायचा.

शाळा मुलांना लांब वाटायची आणि दुसरे म्हणजे शिक्षणामुळे आपला विकास होईल, जरा भले दिवस येतील हा विश्वासच मुळी या परिसरातल्या आदिवासी लोकात नाही. मग मुलं शाळेत हजेरीपटावर येणार कशी?

मग एक गंमतीची बैलगाडी योजना केली गेली. हायस्कूलपासून ही बैलगाडी निघायची. चौकाचौकात थांबायची, घंटा वाजायची, घंटेचा आवाज ऐकून ही गर्दी व्हायची. बैलगाडीच्या आकर्षणाने का होईना, लहान मुले गाडीत बसायची मोठी मुले गाडीमागोमाग मिरवणुकीने चालत राहायची. आता बालवाडीत भरपूर मुले येऊ लागली. इतक्या लांबून मुलं शाळेत येतात हे पाहिल्यावर, जवळची



आसपासची मुलंही येऊ लागली. बालवाडीत आल्यावर मुलं स्वच्छ, नीटनेटकी दिसू लागली. मुलांना हळूहळू बालवाडीची गोडी वाटू लागली. ७-८ वर्षाच्या या जाणीवपूर्वक, कल्पक योजनेमुळे बालवाडीतील गळतीचे प्रमाण कमी झाले. विद्यार्थीसंख्या १०१ झाली तेव्हा सगळ्यांना इतका आनंद झाला की केलेल्या प्रचंड परिश्रमाचे आणि चिकाटीचे सार्थक झालेले पाहून सत्यनारायणाची पूजाच केली.

ज्या लोकांच्यात काम करायचे, ज्यांच्यासाठी हे काम करायचे त्यांच्यात मिसळल्याशिवाय, त्यांना समजून घेतल्याशिवाय काम करणे शक्यच नसते.- हे अनुताईंनी स्वानुभवाने जाणले होते.

आदिवासी मुलींबरोबर एकरूप होऊन त्या तारकानृत्य शिकल्या-नाचल्या. अनुताईंना वाटायचे आदिवासींचा विश्वास संपादन करायचा तर त्यांच्याशी एकरूप व्हायला हवे. त्यांचे सणवार, खेळ, गाणी, नाच, वेशभूषा, आहार- या साऱ्यांची माहिती करून घ्यायला हवी. त्यांना दिल्या जाणाऱ्या शिक्षणामुळे ही मुले आपल्या वन्य-आदिवासी जीवनाशी समरस होऊ शकली नाहीत तर!

वारल्यांच्या मुलांना सुशिक्षित, सुसंस्कारित करायचे म्हणजे त्यांना मुळापासून, मूळ रीति-संस्कारापासून उपटायचे नाही. मुले शक्यतो त्यांच्या त्यांच्या कुटुंबातच राहिली पाहिजेत. पाळेमुळे त्यांच्या झोपडीतच राहिली पाहिजेत. कारण आदिवासींना त्यांच्या कुटुंबातील एखादेच मूल वसतिगृहात धाडणे पालकाना शक्य होई. बाकी भावंडे घरातच राहत. गुरे वळणे, रानातून कंदमुळे तोडून आणणे, भावंडांना सांभाळणे.- अशी कामे करीत. त्यामुळे ती अशिक्षितच राहात आणि मग एकाच घरात ही अशी विरोधाभासाची परिस्थिती निर्माण होत असे. वास्तविक पाहता या भागातलं खरं शिक्षण म्हणजे मुलांना माणसात आणायचं हे आहे. अनुताईंच्या शैक्षणिक पद्धती, साधने कुठल्याही पुस्तकातून उचललेल्या नाहीत. त्या आंतरिक उमाळ्यातून

फुलल्या आहेत. सलगदृष्टीने केलेल्या निरीक्षणाचा आणि अनुभवाचा तो परिपाक आहे.

शिक्षक-पालक, शिक्षक-विद्यार्थी संपर्क वाढविण्याची गरज अनुताईंनी ओळखली. विद्यार्थ्यांना आईच्या ममतेनं वागविलं पाहिजे. ही अनुताईंची शिकवण असते.'शिक्षकाची भूमिका ही आईसारखी असते'- असे विनोबा भावे यांनीही म्हणून ठेवलं आहे. 'आई लहान मुलास जमिनीवरून आपल्या कडेवर उचलून घेताना स्वत: खाली मुलाच्या पातळीवर वाकते. मग आपल्या उंचीवर किंवा पातळीवर मुलाला कडेवर घेते. शिक्षकानेही असेच मुलाच्या पातळीवर जाऊन मग त्याची ज्ञानाची पातळी उंचावली पाहिजे'. असं विनोबा सुचवीत. बालब्रम्ह समजून विद्यार्थ्यांची शिक्षकांनी उपासना करावी. देवाची पूजा निर्माल्याने होत नाही. शिळ्या भाताचा नैवेद्य देवाला दाखविला जात नाही. शिक्षकांनीही रोज नवे, ताजे ज्ञान मिळवून विद्यार्थ्याला अर्पण करावे. नवेनवे प्रयोग करावेत.-' अशी अनुताईंची धारणा आहे आणि त्यानुसारच आपल्या अनुभवातून, धडपडीतून त्या ताराताईंच्या मदतीने, नवे नवे प्रयोग करीत राहतात. ''नेत्याची राहणी साधी हवी. आहार साधा हवा. इतर कार्यकर्त्यांपेक्षा वेगळ्या अधिक सुखसोयी नेत्याने उपभोगता कामा नये.'' ही महात्मा गांधींची विचारसरणी अनुताईंच्या अंगी पुरेपूर बाणली आहे. आणि त्यामुळेच पावसाने गळणाऱ्या छपराच्या खोलीत, रात्रभर कॉटवर बसून राहणाऱ्या अनुताई- ताराबाईंविषयी जन आदराने थक्क होऊन जात.

मुलांसाठी, मुलांत कार्य करायचं म्हणजे मुलांच्या आईबापांच्या मनात विश्वास निर्माण करायला पाहिजे तसा तो करण्याचा प्रयत्न केला, तरीसुद्धा त्यांच्यासाठी काम करणं हे वाटतं तितकं सोप्पं नाही. अनेक अडथळे, काट्याकुट्यांचे मार्ग बोचऱ्या आठवणी मागे टाकत हा विकासाचा प्रवास चालू आहे.



अशीच एक दुखरी आठवण अनुताईंनी सांगितली.

'नारळीपौर्णिमेचा दिवस. बोर्डीला धुँवाधार पाऊस लागलेला. झावळ्याच्या झडपा आणि कौलावरील गवताच्या पेंड्यांचा रेनकोट घरांनी घातलेला. नारळीपौर्णिमेनिमित्ताचे नेहमीप्रमाणे भजन-पूजन सुरू झाले. सकाळीच मुले या कार्यक्रमासाठीं बालवाडीत आली होती. त्या जागेजवळच एक हौद होता. हौदाला पाऊलभर रूंदीची व पाच-सहा फूट उंचीची व्यवस्थित भिंत होती. पावसाने तो हौद तुडुंब भरला होता. त्या हौदातल्या पाण्याचीही नेहमीप्रमाणे पूजा झाली. नारळावर नारळ आपटून फोडायला सुरुवात झाली. ज्याच्या हातून असा नारळ फुटेल त्याला विशेष मान' द्यायचा ही नेहमीची रीत. अशी ही धम्माल मजा झाल्यावर सर्व मुलांना घरी पाठविण्यात आलं. मुलं गेल्यावर अनुताईंसह सहकारी जेवायला बसले.

इतक्यात आरोळी आली. 'बुडालाऽ, बुडालाऽ.'
हातातला घास हातातच राहिला. सगळे हौदाकडे पळाले. पाहतात तो काय!

बालवाडीतला एक चार वर्षांचा छोटा मुलगा हौदातील पाण्यात गटांगळ्या खात होता. त्याला पटकन बाहेर काढले. गरगर फिरवून नाकातोंडातलं पाणी काढले. तोपर्यंत डॉक्टरही आले पण काही उपयोग झाला नाही. क्षणातच त्या इवल्याशा जीवाचा प्राण गेला.

सर्वांना अपार दु:ख झाले. हरिजन वाड्यात ही बातमी समजताच, त्या मुलाची आई आणि इतर बायका धावतच शाळेत आल्या.

हातात बांबू सोलण्याचे विळे कोयते घेऊन अंगावर धावून आल्या. अनुताईंना मारायला निघाल्या. अनुताई सुन्न होऊन बसलेल्या. इतक्यात गावातील मंडळीही धावून आली. त्या बायकांची समजूत घातली. तेव्हा मुलाचे प्रेत घेऊन त्या बायका हरिजन

वाड्यात निघून गेल्या.

फौजदार आले. सर्व चौकशी झाली. पण मुलाचे शव जागेवर नसल्याने काहीच करता आले नाही. संध्याकाळी नेहमीप्रमाणे कामावरून, घरी परतलेल्या त्या मुलाच्या वडिलांना ही दु:खद बातमी समजली. तो माणूस फार समजूतदार होता. शाळेत आला. अनुताईंना म्हणाला, 'मुलाला शाळेतून घरी पोहोचवल्यावर पुढे तो कुठे जातो, कुठे खेळतो? हे पाहण्याचे काम आईचे होते. तुमचा काही दोष नाही.'

अनावर दु:खाने सुन्न झालेल्या. अनुताईंचा जीव या बोलण्याने भांड्यात पडला.

या रानमाणसांची एक निराळीच दुनिया असते. गावातल्या माणसाशी कमीतकमी संबंध ठेवण्याकडे त्यांचा कल असायचा. ढवळ्या-पांढरपेशा माणसांबद्दल त्यांच्या मनात एक प्रकारची धास्ती भरून असे. वारली माणसाने ढवळ्या माणसाची एवढी दहशत घेतली यालाही काही कारणे होती. व्यापारी, कंत्राटदार, सावकार, दुकानदार, पोलीस, सरकारी अधिकारी सार्‍यांनीच त्यांना आजवर केवळ लुबाडले होते. आदिवासी माणसाचा स्वभावच एकूण भोळसट. त्याच्या वृत्तीत बंडखोरी कमी. त्याचा गैरफायदा सुधारलेले लोक पिढ्यान् पिढ्या घेत आले होते. त्यामुळे शासनातर्फे आलेल्या किंवा समाजसेवेसाठी आलेल्या शहरी माणसांकडेसुद्धा ही माणसे संशयाने पाहत.

पुष्कळ दिवस डोंगराळ भागात राहिल्याने, शहरी सुधारणेपासून ही आदिवासी माणसं दूरच राहिली आहेत. त्यामुळे अज्ञानी, व्यसनी झाली आहेत. वर्षातून कित्येक महिने ही मुले अर्धपोटी असतात. शेकडो वर्षांच्या शोषणाने दारिद्र्याने, उपासमारीने वारल्यांचा इतरांवरचा विश्वासच उडाला आहे. दारिद्र्य भरपूर. त्यामुळे सांघीक



ते काम करून मजुरी मिळवायची. ही पद्धत. ज्याचे त्याने मिळवावे आणि पोट भरावे हे यांचे कौटुंबिक धोरण. एकंदर वागणे तुटकच. सतत काम करतात तरी पोटापुरते मिळत नाही. जीवनाच्या गरजा कमी. त्यामुळे अपेक्षाही कमीच. स्वत:चे डोके वापरायचे नाहीत. पिढ्यान्‌पिढ्या कर्जात बुडालेले. अज्ञानामुळे अंधश्रद्धा खूप. भूतेखेते, अंगारे-धुपारे, भगत यांवर विलक्षण विश्वास. पण डॉक्टरचे औषध घेणार नाहीत. जंगली वनौषधींचा, झाडपाल्यांचा उपयोग मात्र चांगला माहीत असतो. एकूणच या आदिवासींचं जीवन संकुचित.

भारताच्या एकूण लोकसंख्येपैकी ७ टक्के लोक आदिवासी आहेत. महाराष्ट्राच्या एकूण लोकसंख्येच्या ६ टक्के लोक म्हणजे सुमारे चाळीस लाख लोक महाराष्ट्रात आदिवासी आहेत. यापैकी तीन-सव्वातीन लाख आदिवासी वारली जातीचे आहेत.

या वारली लोकांचे जीवन संकुचित तर आहेच, पण स्वत:विषयीच्या त्यांच्या कल्पनाही हीन आहेत.

'आपण सर्वात निकृष्ट जमात असून परमेश्वराने आपल्याला सगळ्यात शेवटी निर्माण केले. अशी त्यांची समजूत आहे. आम्हाला निर्माण करून देवाने पीडा वारून टाकली 'म्हणून आम्ही वारली.' असं ते स्वत:ला कमी लेखतात. त्यामुळे वस्तीपासून सुरक्षित अंतरावर परंतु रानातच बांबूच्या झोपड्या बांधून, एखाद्या पाणवठ्याजवळ ही माणसं राहतात आणि गावातल्या माणसांशी कमीतकमी संबंध ठेवतात. जरासे फटकूनच वागतात म्हणाना! त्यांची स्वत:ची अशी बोलीभाषा आहे. त्यांची नाचगाणी, खाणी-राहणी, देवदेवता सगळंच काही निराळं आहे.

'वाघ्या, नारायण, हिमायदेवी' हे या आदिवासींचे देव. वाघ्या गावचे संरक्षण करतो ही भावना. लाकडावर कोरलेली वाघ्याची मूर्ती असते. नारायण अगर हिरव्या देवाची पूजा भाताचा हंगाम संपल्यावर

होते. हिमायदेवी म्हणजे पार्वती. तिचीही नारायण देवाबरोबरच पूजा होते. आदिवासींना 'राम-कृष्ण' माहीत नाहीत. एकूण रानातले भूत आणि शहरातला ढवळा (पांढरपेशा) माणूस यांच्या धाकात, त्यांना चुकवीत सगळं आयुष्य कंठायचे ही सवय. एकूण स्वभाव भोळसट. वृत्तीत बंडखोरी कमीच. त्यामुळे एकप्रकारची भीती, न्यूनगंड बाळगूनच ही जमात जगत असते.

अशी ही आदिवासी जमात. त्यांची वागण्याची तऱ्हाच निराळी. यांची अस्मिता जागी करायची, अज्ञान अंध:कार दूर करायचा हे कठीण काम ताराताई मोडकांनी सुरू केलं आणि प्रत्यक्षात साकार करण्याचं थोर कार्य अनुताईंनी पार पाडलं.

आपण आपल्या मुलांना जन्मल्यावर कौतुकानं नाव ठेवतो. आपल्या नावाचा. अभिमान बाळगतो. आदिवासी बारसे करीत नाहीत. एक वेगळाच संस्कार करतात.

मूल जन्माला आल्यावर मुलगी असेल तर तिसऱ्या दिवशी आणि मुलगा असेल तर चौथ्या दिवशी नव्या पांढऱ्या कापडाच्या झोळीत, मुलाला ठेवतात. पांढऱ्या कापडाच्या झोळीखाली सूपभर भात, मूठभर वाल, त्यावर भाजलेली बोंबील आणि कुंभाच्या पानात दिवा ठेवून थाळे पळीने वाजवून सुईण बाळाला सांगते.

'वाघाच्या बच्च्याला भिऊ नको!' असे सांगून चार वेळा बाळाला झोळीच्या खालून वर नेतात. पण नाव मात्र ठेवले जात नाही. सोमवारचा तो सामा, ती सोमली. बुधवारी जन्मलेला बुध्या, शुक्रवारी जन्मलेला तो सुकर, ती सुकरी. मूल रडके असेल तर रडका, बारक्या, नवसाने झालेला तर नवशा किंवा नवशी अशी त्यांची नावे असतात.

अनुताईंनी हे पाहिले आणि शाळेत हजेरीपटावर नाव घालायला अडचण येऊ नये म्हणून, आदिवासी मुलांची बारशी करण्याचा



कार्यक्रम हाती घेतला त्यामुळे २५-२६ वर्षानंतर आदिवासी मुलांची आधुनिक नावे शाळेच्या हजेरीपटावर आलेली दिसतात.

शिक्षणापासून वंचित झालेल्या, एवढंच नव्हे तर अक्षरशत्रू असणाऱ्या या मुलांना आपण शिकत आहोत असं वाटू न देता शिकविण्याचा, एक विलक्षण चिकाटीचा अनौपचारिक अभ्यासक्रम या ठिकाणी सुरू करण्यासाठी, गप्पा, गाणी, खेळ, ओढ्यातील आंघोळी यातून सहजशिक्षण दिले.

ताराबाई मोडक यांनी या आदिवासी मुलांच्या शिक्षणासाठी एक निश्चित व सविस्तर योजना आखली. आदिवासींची एकजिनसी वस्ती असेल अशा एखाद्या जंगलातल्या ठिकाणी जमून आदिवासी मुलांकरिता एखादी शिक्षणसंस्था काढावी. त्याकरिता शासनाकडून पैसा व पाठिंबा मिळवावा, असे त्यांच्या मनात होते. हा विकासवाडी योजनेचा आराखडा मनात असताना ताराबाईंच्यासमोर ठाणे जिल्ह्यातील वारली जमातीची आदिवासी मुले होती आणि हे कार्य करण्यासाठी ताराबाईंच्या कसोट्यांवर पूर्णपणे, सर्वार्थाने उतरणाऱ्या शिष्या म्हणजे अनुताई वाघ या डोळ्यासमोर होत्या. अनुताई वाघ नावाची हुकमी शक्ती मग ताराबाईंनी मोवतालच्या वस्त्या आणि त्यातल्या शाळा यांची पाहणी करण्याच्या कामी नेमून टाकली. अनुताईंची काम करण्याची शक्ती एवढी जबरदस्त की आठवड्यातले पाच दिवस त्या भ्रमंतीचे काम करीत व शनिवार, रविवार बोर्डीचे काम पाहत. मिळाली तर बैलगाडी, दिसला तर टांगा. नाहीतर दोन पायावर अनुताईंची ही भटकंती पाहणी चाले. या पाहणीत त्यांच्या लक्षात आले ते सारे त्यांनी ताराबाईंच्या समोर मांडले. मग सारी योजना आपल्या सहकाऱ्यांच्या सल्ल्याने तयार करून ती सरकारपुढे मांडली. पाळणाघरापासून ते वसतिगृहापर्यंत वेगवेगळ्या विभागासाठी स्वतंत्र इमारती विद्यार्थ्यांसाठी वसतिगृहे व कार्यकर्त्यांसाठी

निवासस्थाने या सगळ्यांची गरज होती. 'कोसबाड' ला हे सगळं उभारायचं होतं. ताराबाई-अनुताई या सगळ्यांनी कोसबाडची टेकडी गाठली. गोखले एज्युकेशन सोसायटीचे कृषि विद्यालय १९४९ पासून तिथे जवळच होते. त्याजवळच्या सुमारे अठरा एकर जमिनीवर ही योजना निश्चित झाली. अखेर २० जून १९५६ रोजी 'गरिबांची मॉंटिसरी' कोसबाडच्या जंगलात राहायला आली. विकासवाडीच्या कामावर ताराबाईंनी अनुताईंची नेमणूक केली. पाळणाघर व बालवाडी हे दोन विभाग प्रथम सुरू करण्यात आले. घरोघर भेटी देऊन, पाड्या-पाड्यावर जाऊन मुले गोळा केली. झाडं, पानं, फुलं, गुंजा, शंख-शिंपले या निसर्गातून जमविलेल्या साधनांतून, त्यांनी शैक्षणिक साधने निर्माण केली. वडाच्या कोवळ्या पारंब्या ठेचून, त्यांचे ब्रश तयार केले. चुनखडी, पिवळी माती यांचा उपयोग रंगकामासाठी होऊ लागला. मारलेला साप, अस्थिपंजर झाला म्हणजे त्याचं निरीक्षण करणं, एकाच वेळी दगड आणि चिंचोका जमिनीत पुरून त्यांपैकी कशात जीव आहे हे ठरवणं. ओहोळावरून उडी मारण्याच्या खेळात काठीनं त्याची लांबी मोजणं, झाडाच्या सावलीची रेषा बदलली की तीवर तासातासानं खुणेचा दगड ठेवणं. भाजलेल्या पाखराच्या मांसाचा तुकडा, डाळीएवढा मिळाला तरी सगळ्यांनी वाटून खाणं असे असंख्य प्रयोग अनुताईंनी केले. असंख्य मजेशीर घटनांतून सृष्टिज्ञान, जीवनशास्त्र, वनस्पतीशास्त्र, कालमापन, अंकगणित, भूगोल, स्वच्छता, सहकार इ. अनेक विषयांवरचे धडे मुलांना आपोआप मिळत गेले.

ग्रामीण भागातील शैक्षणिक साधनं कमी खर्चाची असायला हवीत असं महात्मा गांधीजींप्रमाणेच ताराबाईंनाही वाटायचं. मग त्यानुसार अनुताईंनी भिंतीवर कोळशानं अक्षरे लिहायला सुरुवात केली.



शैक्षणिक साधनं कमी खर्चाची असायला हवीत त्याप्रमाणेच ती मुंबईहूनही विकत आणायची नाहीत; असा ताराबाई- अनुताईंचा कटाक्ष होता. तेव्हापासून मग कमी खर्चात आणि आदिवासी मुलांच्या परिचयातील वस्तूंमधून तयार केलेली शैक्षणिक साधनं 'बालवाडी' साठी उपयोगात आणली जाऊ लागली.

गावाकडे चिकू-अननसाच्या वाड्या असतात. तशी मुलांची-बाळांची ती बालवाडी. अवतीभवतीच्या परिसरातून जमविलेल्या साहित्यातूनच या बालवाडीची शाळा-प्रयोगशाळा विकसित होत गेली.

बोर्डीपासून जवळच असलेल्या 'नारगोंल'च्या समुद्रकिनाऱ्यावर काळी रेती मिळे. एके दिवशी अनुताई पिशवी भरून रेतीच घेऊन आल्या. या रेतीचा काय उपयोग करता येईल? असा विचार करीतच त्यांनी जाड कागद घेऊन त्यांना त्यांनी सरस लावला. त्यावर रेती पसरून मग त्याची अक्षरे कापली आणि ती पुठ्ठ्यांच्या तक्त्यावर चिकटविली. बाजारात जी अक्षरे सात-आठ रुपयांना मिळत ती या पद्धतीने तयार केल्याने आठ बारा आणेच खर्च होऊ लागला. चित्रकामासाठी छोटे छोटे तट्टे मातीने सारवून त्यांचे लहान लहान फळे तयार केले. याशिवाय कातरकाम, घडीकाम, होडीकाम, चिकटकाम यासाठी वर्तमानपत्रांची रद्दी मिळवली. वर्तमानपत्रांच्या कागदाच्या गुंडाळ्या करून, त्यात निरनिराळ्या वजनाचे दगड, रेती भरून, त्यावर आकर्षक लाल-निळे घोटीव कागद चिकटवून निरनिराळ्या प्रकारच्या आवाज-डब्या तयार केल्या. अगदी लहान चिटोरी-कपटे-चिंध्या पाण्यात भिजत घालून त्यांच्या लगद्यातून खेळणी, सजावटीच्या वस्तू बनविण्यात येत. लाकडापेक्षा पुठ्ठा स्वस्त, तेव्हा गणित शिकविण्यासाठी कित्येक साधने पुठ्ठ्याची बनवली. गणिताच्या साधनांमध्ये तुळशीमाळांचाही उपयोग झाला.

शंखशिंपल्यांचे तर संग्रहालयच केले. खेड्यातील मुलांना रुचतील, पटतील अशा बालगोष्टी तयार करण्याचा प्रयत्न झाला.

एकूण गांधीजींच्या कल्पना प्रत्यक्षात उतरविण्यात बोर्डीच्या बालवाडीला यश आले.

वर्गामध्ये दुकान मांडलं जायचं. दुकानात विकायला वस्तूही सुरूची फळे, गुंजा, वडाची पाने, शंखशिंपले, लाकडाचा मुसा, पाणी अशा अवतीमवतीची दगडाची वजने बांबूची मापे तयार केली गेली. वेगवेगळ्या वजनांचे दगड शोधून त्यावर एक किलो, पाचशे ग्राम असे रंगाने रंगवले. पोकळ बांबूमध्ये पाणी ओतून, त्या आकाराचे, बांबूचे तुकडे कापून एक लिटर, अर्धा लिटर अशी बांबूची मापे तयार केली. कारण ही शैक्षणिक साधने बाहेरून विकत आणणे परवडणारच नव्हतं. मदतीसाठी सतत झोळी पसरलेलीच असे.

अशा या वजन मापातून अंकगणित, हिशेब, जीवनव्यवहार शिकवायला सुरुवात झाली. तरीसुद्धा काही काही पाड्यांवर मुलं शिकायला यायचीच नाहीत. कुठेतरी झाडाखाली पत्ते खेळत बसायची. कोसबाडच्या ताईंना बघून, शाळेच्या भीतीने पळून जायची.

मग एक दिवस अनुताई-रमाताईंनी त्या मुलांना गाठलंच आणि सांगितलं - 'चला, आपण पत्ते खेळू या.'

मुलं बघतच राहिली. त्यांचा विश्वासच बसेना.

'अरे, खरंच खेळू या.' असं म्हणून ताईंनी पत्ते वाटले आणि प्रत्येकाच्या हातात कोणते पान आहे ते विचारले.

झाडाखाली पाने, चिंचोके, बियांचे वेगवेगळे ढीग मांडले आणि सांगितलं ज्याच्या हातात जे पान असेल, तेवढ्या बियांचा ढीग करायचा. पंजी पत्ता असेल तर पाच बियांचा ढीग करायचा. दुर्री असेल तर दोन बियांचा ढीग करायचा अशा प्रकारे खेळातून त्यांना संख्याज्ञान देण्याचा प्रयत्न केला.



वेगवेगळ्या पक्ष्यांच्या पिसांच्या रंगजोड्या लावणे. बांगड्यांना दोरे गुंडाळून त्यांच्या रंगजोड्या लावणे असे अनेक प्रयोग चालू होते. शिवाय बोर्डीला समुद्र जवळ. तिथून शंख-शिंपले आणून ते निवडण्याचे काम करणे, फुटके शंख ओवायला देणे, शंखांचे विविध आकार, रंग पाहून त्याप्रमाणे वर्गीकरण करणे. काड्या, पाने, बियांचे रंग पाहून त्याप्रमाणे वर्गीकरण करणे. रेतीकागद बनविणे. किसायला साबू. कुटायला विटकर. भरडायला गोवरी. बाटलीत भरायला पाणी किंवा रेती असे अनेक शोध गरजेतून लागले. कचऱ्यातून कला निर्माण झाली. आदिवासी मुलांच्या निरक्षर गोळ्याला आकार येऊ लागला. या नैसर्गिक प्रयोगामुळे आदिवासी मुलांना जीवन-व्यवहार, मुक्तव्यवसाय इ. शिक्षण मिळू लागले. आदिवासी माणूस जागा होऊ लागला. तसतशी ही साधने हे प्रयोग करण्याचा छंदच अनुताई आणि त्यांच्या कार्यकर्त्यांना लागला.

खेडेगावातील बालवाडीच्या कार्यपद्धतीचा एक नवा नमुना अशाप्रकारे तयार होत होता आणि त्यातूनच 'बालवाडी कशी चालवावी' हे पुस्तक अनुताईंनी लिहिले. अनुताईंचं हे पुस्तक इतकं सुपरिचित झालंय की त्याच्या आत्तापर्यंत पाच आवृत्त्या निघाल्या आहेत. शिवाय हिंदी, गुजराती, इंग्रजी या भाषांतही अनुवाद झाला आहे.

बालवाडीचा उपक्रम असा जोशात चालू असतानाच, एक गोष्ट अनुताईंना सतत जाणवत होती की आदिवासी माणसं दोन घटका थांबून बालवाडीकडे कुतूहलाने पाहतात पण आपल्या मुलांना मात्र रोज पाठवीत नाहीत. विशेषत: फेब्रुवारी ते जूनपर्यंत या मुलांची शाळेतील गळती फारच असते, कारण या दिवसात घरातील अन्न संपलेले असायचे. आदिवासींचे उपास सुरू असायचे. मग मुले रानोमाळ भटकत खाणे शोधत हिंडायची. रानटी फळे कधीच

खायची. उडता पक्षी गलोलीने मारून, तेथल्या तेथे गवत गोळा करून पेटवून भाजून खायची. अंगावर कपडा नाही. पोटात अन्न नाही. अशांना अनुताई कोणत्या तोंडाने सांगणार,

'बाबा रे, रानात गवताची मुळे, फळे शोधायला जाऊ नकोस.' अशीच एकदा बरीच मुलं शाळेत आली नाहीत तेव्हा नंतर अनुताईंनी त्यातल्या एकाला विचारले तर तो म्हणाला,

'काल आमचा उपास होता म्हणून शाळेत नाही आलो.'

अनुताईंच्या लक्षात येईना कसला उपवास?

मग पुन्हा विचारले कसला उपवास होता रे?

दोन्ही हात उडवत मुलगा म्हणाला, 'काल आमच्या घरात अन्नच नव्हतं खायला.'

पोटात कावळे ओरडत असताना, मुलांना घोकंपट्टी कशी सुचणार! पुस्तकी ज्ञानाने पोट भरत नाही. हे त्या अडाणी पोरांइतकंच सहृदय अनुताईंनीही जाणले होते. मग त्यावर उपाय काय!

तर, अंगणवाडी.

मुलं शाळेत येत नाहीत ना! मग शाळेचं झाड मुलांच्या अंगणात लावायचं. आईवडील कामानिमित्त बाहेर. जरा मोठी मुलं, विटांच्या मट्टीवर अगर कुठेतरी कामावर. मग ८-१० वर्षांच्या मुलांनी गाडगी, मडकी, कुडाच्या भिंतीचं घर सांभाळायचं. लहान भावंडाना सांभाळायचं अशा मुलांसाठी मग, अनुताईंनी पहिली अंगणवाडी सुरू केली ती.

'हल्लपत निवास'

या अंगणवाडीचीसुद्धा मजाच झाली. पहिल्या दिवशी मुलं शिक्षकांना मिऊन पळून गेली. घरात लपून, दाराआडून नुसती किलकिल्या डोळ्यांनी बघत राहिली मग अनुताईंनी पण एक गंमत



केली. दुसऱ्या दिवशी अनुताईंनी वाटीमध्ये मणी व दोरा आणला आणि त्या वाट्या-दाराशी ठेवून दिल्या. हळूच बाजूला जाऊन, सगळ्या शिक्षिका बघू लागल्या तर थोड्यावेळाने सगळ्या वाट्या आत गेल्या आणि माळांसह बाहेर आल्या. हळूहळू मुलांशी ओळख होऊ लागली. मुलं शिक्षकांची वाट पाहू लागली. मग तिथे जाऊन अंगण झाडायचं. भोवतालच्या झोपड्यांच्या भिंती चित्रित करायच्या, झाडांचे बुंधे रंगवायचे. चित्रकलावर्ग सुरू झाला. गावातल्या बालवाडीत, दूरवरून येऊ न शकणाऱ्या मुलांच्या अंगणात अंगणवाडी सुरू झाली. मुलं त्यात रमू लागली.

तरी रोजच्या जगण्यासाठी चाललेली धडपड, अडचणी कमी होईनात. काही मुलांचाच प्रश्न सुटला. मग शाळा कशी फुलणार? शाळेचं झाड कसं बहरणार? सतत विचारमंथन सुरूच. या मुलांसाठी त्यांच्या गरजा पुरविणारी, शाळा हवी. तुमच्या-आमच्या सारखी शहरी शाळा १२ ते ६ इथे काय उपयोगाची? कामातून एवढा वेळ आहेच कुठे या आदिवासी मुलांकडे? पुस्तकं-वह्या-पेन्सिली आणायच्या तरी कशा आणि कुठून? रोजचे पोटभर जेवायला न मिळणाऱ्या, या मुलांना आपल्या शहरीशाळांची चैन परवडणारी नाहीच. आईबाप सकाळीच कामावर निघून गेल्यावर, लहान भावंडं सांभाळायचं कामही या मुलांना करावं लागत. मग मी लहान्यांना कुठे ठेवणार? शाळेत कशी येणार?

शिक्षणाचा हा बिकट प्रश्न सोडविण्यासाठी, ताराबाईंनी या भागात मोठ्या प्रमाणावर विकासवाडी सुरू करायचं ठरवलं. तेव्हा संस्थेचे व्यवस्थापक म्हणून भावनगरहून श्री राममाई पाठक यांना ताराबाईंनी बोलावून घेतले. अनुताईंवरही जबाबदारी टाकली.

आता राममाईंबरोबर काम करायचं म्हणजे आला कां नाही प्रश्न?

ते गुजराथीत बोलणार. ते अनुताईंना समजायचं नाही आणि अनुताई मराठीत बोलायच्या ते राममाईंना समजायचं नाही. पण काम अडलं नाही. याला कारण 'अडचण' हा शद्बच अनुताईंच्या कोशात नाही. अडचण म्हणून कसली अनुताईंना कधी वाटलीच नाही.

बोर्डीच्या ग्राम-बाल शिक्षण प्रयोगाचे ते सुरुवातीचे दिवस होते. अशाच एका गवताची छप्परं, कुडाच्या भिंती असलेल्या एका झोपडीत अनुताई मुलांना शिकवीत होत्या. पाऊस धोडं धोडं कोसळत होता. छप्परातून पाणी ठिकठिकाणी गळत होतं. बाहेर चिखल झालेला. आत जमीन ओली झालेली. एका कोरड्या कोपऱ्यात अनुताई-मुलांना जवळ घेऊन, भिजल्या पाखरांना कुशीत घेऊन, पावसापेक्षा मोठा आवाज काढून म्हणत होत्या,-

''कोल्होबा ऽ कोल्होबा !

बोरे पिकलीऽ''

मुलं म्हणत होती,- ''नको नको म्हातारे ऽ..''

अनुताई म्हणत होत्या,- 'कोकणचा फणस इथे कापू?''

मुलं म्हणत होती,- 'इथ्थे नक्को !''

बाहेरचा कोसळणारा पाऊस आजूबाजूला पसरलेली मासळीची दुर्गंधी, शेजारच्या खोपटातील भांडणाचा तारस्वर. या सगळ्या कोलाहलात, आपल्याच मुलात रममाण होऊन शाळा भरविणाऱ्या अनुताई म्हणजे एक जबरदस्त व्यक्तिमत्त्व आहे.

अशा शिक्षिकेचा- अनुताईंचा मुलांना लळा लागला नाही तरच नवल !

अनुताई काही कामासाठी दोन-तीन दिवस मुंबईला गेल्या. परत आल्यावर त्यांनी बालवाडीत पाऊल टाकले. तशी छोट्या लक्ष्मीने येऊन त्यांचा पदर धरला.

''ताई तू आलीस ! कुठं गेली होतीस ?''



''मी यायचीच होते, तुम्हांला सांगून गेले होते ना कामाला !''

''मला तर सपान आले, तू गावाला गेली ती आता यायचीच नाही. बिजी ताई (दुसरी ताई) यायची राती. मला जाग आली तर मी आयशी ठाकले (निजले) होते. आईला चिकटून चिकटून निजले. बिजी ताई आम्हांला नको. तूच हवीस !''

''असं नाही बोलू दुसरी ताईही चांगली असते.'' - असं म्हणत अनुताईंनी प्रेमाने लक्ष्मीला जवळ घेतले.

तळमळ, धडपड आहे तिथे मार्ग निघतोच. अनुताईंनी या मुलांसाठी त्यांच्या गरजा पुरविणारी शाळा सुरू केली. बरोबर धाकट्या भावंडांनाही शाळेत आणायला सांगितलं. गंमत वाटतेय् ना !

पण खरी गोष्ट आहे ही !

नाही विश्वास बसत ?

मग चला कोसबाडला- अनुताईंनाच विचारा ना !

मग त्या सांगतील की बालवाडीतून अंगणवाडी आणि अंगणवाडी ते विकासवाडी. ही शाळेची एकेक रूपं कशी साकार होत राहिली ते !

तेव्हा ही मुलं आपल्या भावंडांना घेऊन, शाळेत येणार असं ठरलं. मग पाळणाघर तान्ह्या मुलांसाठी.

बालवाडी ३ ते ६ वर्षे मुलांसाठी आणि शाळेचं नावही न ऐकलेल्या, पाहिलेल्या त्यांच्या मोठ्या दादांसाठी इयत्ता पहिली.

अशी पाळणाघर-बालवाडी-प्राथमिक शाळा एकत्र आणणारी शाळा उर्फ विकासवाडी साकार झाली. जेणेकरून प्रत्येक अडचणीवर मात करून मुलांच्या शिक्षणाचा प्रश्न सोडविला गेला.

दर्जीवाड्यामध्ये अशा प्रकारची एक लहानशी विकासवाडी चालवून बघितली. तीनही विभागात मिळून या विकासवाडीत एकूण वीस मुले होती. या विकासवाडीचा भरपूर बोलबाला झाला. ही

विकासवाडी कशी चालवावी? याचे प्रशिक्षण देणाऱ्या ट्रेनिंग कॉलेजलाही मान्यता मिळाली. यामुळे 'आदिवासी मुलांचे शिक्षण' या विषयाचा अभ्यास होऊ लागला.

या विकासवाडीत प्रत्येक गोष्टीची काळजी घेतली जाऊ लागली. विकासवाडीत कधी कधी मुले-मुली झोपायला येत. एका रात्री मोठ्या वनशीच्या कानातून कळा येऊ लागल्या. तिने अनुताईंना उठवले.

'ताई कान दुखतो.'

आता एवढ्या रात्री हिला काय देणार?

अनुताई म्हणाल्या, 'आता नीज तशीच. सकाळी देईन काहीतरी औषध.'

वनशी परत झोपायला गेली. पण अनुताईंना तिच्या काळजीने झोप येईना. वनशीची आई असती तर 'सकाळी बघू' असं म्हणून झोपली असती का?'

अनुताई पटकन् उठल्या. लसूण ठेचली. तेल गरम करून त्यात घातली आणि त्या तेलाचे चार थेंब वनशीच्या कानात घातले. मग वनशीला आणि अनुताईंना दोघींनाही शांत झोप लागली.

अशा हर प्रयत्नांनी मुलांना शाळेची ओढ लावली जात होती. तरी कधी उपस्थिती कमी तर कधी मुलांची प्रगती कमी. असं काहीना काही चालूच राहायचं. तरीही धीरानं, चिकाटीनं प्रयत्न चालूच होते. सुपीक जमिनीतून पीक काय कुणीही काढेल! इथे तर सगळं उजाड माळरान. त्याला बहर यायला वेळ लागणार हे गृहीत धरून सगळ्यांचे प्रयत्न चालू होते. यामध्ये सिंहाचा वाटा ताराबाईंचा असला तरी 'वाघाचा' वाटा अनुताईंचा होता हे निश्चित.

या विकासवाडीची कल्पना अशा तऱ्हेने प्रत्यक्षात उतरली. काही मुले, निदान भावंडे सांभाळीत, घरी पाड्यावर तरी असत.



त्यांच्यासाठी अंगणवाडी विकासवाडी हे प्रकल्प सुरू केले, पण काही मुलांना गुरे चारण्यासाठी रानात जावे लागे तर काही मुलांना थोड्याशा मजुरीसाठी दिवसच्या दिवस कामावर जावे लागे. त्यामुळे ही मुले शाळेत अनियमित राहू लागली. आली तरी एकाग्रता नाही. डोक्यात कामाचा, पोटाचा-भुकेचा विचार. अनुताई हे सर्व पाहत होत्या. त्यांच्यासाठी नवे नवे शैक्षणिक प्रयोग करीत होत्या.

एके रात्री त्यांच्या मनात विचार आला. मुलं कुरणात गुरं चारायला घेऊन जातात. त्यांच्यासाठी तिथेच कुरणशाळा चालविली तर प्राचार्य रा. ह. कापडी यांच्या सहकार्याने कुरणशाळा सुरू झाली. शैक्षणिक साधने काय जिकडे तिकडे विखुरलेली. रिमझिम पाऊस पडतोय. गुरे इकडे तिकडे चरतायत. गुरं राखता राखता मुलं अनौपचारिक शिक्षण घेतायत ही कल्पनाच मोठी अजब आहे. वर आकाश खाली धरती. अशी ही मोठ्ठी शाळा. सृष्टिनिरीक्षणाची विनामूल्य बहुमोल साधने हाताशी. झाडाच्या पानांचे दशक, शतक, हजार केले. त्यावरून संख्यारचनेची कल्पना दिली. तोंडी हिशेब झाले. बडबडगीते, अभिनयगीते मुक्त वातावरणात स्फुरू लागली.

हिरव्यागार गवतावर ताव मारणारी, चुरुचुरु आवाज करीत, गवत खाणारी गाई, वासरे, बकऱ्या आणि त्यांच्यामागे वारा भरल्यासारखी धावणारी काटक आदिवासी मुले पाहिली की मुलांच्यात मूल होऊन, अनुताईंचे गाणे तयार होई.

'हिरव्या हिरव्या माळावर चरती गुरंऽऽ<br>
गाई, बैल, बकऱ्या अन् छोटी वासरंऽऽ'

कृतिपाठ, ज्ञानपाठ सगळं काही मुलांना इथं कुरणात मिळत गेलं.

अनुभवांची जंत्री तयार झाली आणि अनुताईंनी लिहिलेलं 'कुरणशाळा' हे पुस्तक तयार झालं.

आता काळ झपाट्याने बदलत आहे. कुरणशाळांची गरज पूर्वीइतकी राहिलेली नाही. आदिवासी माणूस आता जागा झाला आहे. त्यामुळे अधूनमधून नमुन्यादाखल एखादी कुरणशाळा चालविली जाते एवढंच. निसर्गातून गोळा केलेल्या वस्तूंपासून बनविलेली साधनं वस्तुसंग्रहलयात बघायला मिळतात. प्राथमिक शाळेतील मुलांना या वस्तुसंग्रहालयाचा उपयोग होतो.

आदिवासी मुलं सातवीपर्यंत शिकली तरी पुढे काय? हा प्रश्न उभा राहतो.

या प्रश्नाचा गांभीर्याने विचार करून "बालउद्योगालयाची" निर्मिती केली गेली. दोन वर्षांचा सुतारीकामाचा प्रशिक्षणवर्ग सुरू केला. १७ आदिवासी विद्यार्थी या विद्यालयातून पास झाले. अनुताईंपुढे जेवढे म्हणून प्रश्न उभे राहिले. त्या प्रत्येक प्रश्नाचे उत्तर त्यांनी शोधून काढले.

बालवाडीत येणाऱ्या मुलांनाच उद्योगालयात काम द्यावे असे ठरविल्यावर मुलांचे लोंढेच्या लोंढे शाळेत येऊ लागले. एक नवा प्रयोग यशस्वी झाला. पण पुढे ११ ते २ शाळा असायची मग काम. त्यामुळे मुलांना मजुरी कमी मिळायची. पण गावात सकाळपासून काम केल्यावर अधिक मजुरी मिळते म्हटल्यावर मुलांची संख्या कमी कमी होऊ लागली.

त्यावर मात करण्यासाठी आणखी एक नवा उपाय अनुताईंनी शोधून काढला. शेतात हंगाम नसतो, काम नसते तेव्हा पत्रावळी करणे, रद्दी कागदाच्या वाण सामानासाठी पिशव्या करणे, ढलप्या लाकडे वेचणे इ. कामे सुरू केली पण ती एकूण परिस्थिती लक्षात घेता, अपुरीच होती. भाताचे गवत आणून काचेच्या बाटल्यांना पॅकिंग करण्यासाठी भाताच्या गवताची टोपणे करणे अशी कामे शाळेला जोडून घ्यावी; असं ठरलं तरी म्हणावा तसा प्रतिसाद त्याला मिळाला



नाही. खरं तर ह्या खटपटीमागची अनुताईंची धडपड, तळमळ काही कमी नव्हती.

दिवसभर कामावर गेल्याने शिकता न येणाऱ्यांसाठी रात्रशाळा सुरू केली.
रात्रीच्या शाळेसाठी ठराविक उपस्थिती वगैरे ठेवली नव्हती. घंटा, वेळापत्रक, परीक्षा या कशाचेच बंधन नसलेली ही शाळा. मुक्त अनौपचारिक शिक्षण देणारी. रात्री अकरा बारा वाजेपर्यंत नाच, गाणी, गोष्टी यांचा धुमाकूळ माजवणारी, आनंदाने नाचवणारी अशी ही रात्रशाळा. यात कधी ५० विद्यार्थी यायचे तर एखादे दिवशी ५-६ च यायचे. पुढे मग वार्षिक परीक्षा घ्यायला सुरुवात केली. त्यातून बाराजण सातवी पास झाले.

प्राथमिक शाळेस पूरक अंग म्हणून बाल-उद्योगालयाची निर्मिती झाली. दोन वर्षांचा सुतारीकामाचा प्रशिक्षण वर्ग चालविण्यात आला. त्यावर देखरेख अनुताईंची. याशिवाय सहकारी सोसायटीसाठी धडपड करणे, देणग्यांसाठी प्रयत्न करणे हे चालूच असायचे.

खडे वेचणे, मातीची भर टाकणे. अशा तऱ्हेची कामे लहान मुले मजुरीवर करू लागली. ११ ते २ पर्यंत शाळा असायची. शाळेत येणाऱ्यांनाच काम मिळायचे. मग शाळेत मुलांचे लोंढे येऊ लागले. त्याशिवाय आदिवासींना स्थिर व्यवसाय मिळावा म्हणून लेथकाम, सुतारीकाम सुरू केले व इयत्ता ५ वी ते ७ वीच्या वर्गांसाठी, सुतारकाम, शिवणकाम व शेतीकाम अशा तीन व्यवसाय शिक्षणाची सोय केली. जीवन शिक्षण पद्धतीवर आधारित अशी ही योजना सुरू झाली. अशी सारखी काही ना काही धडपड. तारेवरची कसरत चालूच असायची.

६ ऑक्टोबर १९७३ रोजी मुद्रणालय सुरू झालं. थोडंफार शिक्षण घेतलेली, आदिवासी माणसं, थोड्याच दिवसात

लेखनवाचनाशी संबंध न राहिल्याने शिकलेलं सर्व विसरून जातात. पुन्हा निरक्षर होतात. त्यांची साक्षरता टिकावी म्हणून त्यांना वाचायला आवडतील अशी सोप्या भाषेतील २५ पुस्तके आत्तापर्यंत या मुद्रणालयात छापली. 'शिक्षण-पत्रिका' मासिकही येथूनच छापले जाते. याशिवाय १९७६ मध्ये अनुताईंनी ठाणे जिल्हा परिषदेच्यासाठी 'प्रबोधिका' ही खास महिला मार्गदर्शक पुस्तिकाही प्रकाशित केली.

तिखट, मसाले, पापड करून मुंबईला पोहोचविण्याचे काम करण्यासाठी एक 'शबरी उद्योगालय' ही कार्यरत झाले.

खेडेगावात काम करणाऱ्या शिक्षकांचे प्रशिक्षण वर्गही कोसबाडला चालू झाले. 'कोसबाड ग्राम बाल सेविका विद्यालय' हे सबंध भारतात एकमेव होते.

महाराष्ट्र शासनाच्या ग्रामविकास खात्याने, युनिसेफच्या मदतीने महाराष्ट्रात 'सकस आहार प्रशिक्षण योजना' चालू केली. त्यापैकी एक केंद्र कोसबाडला देण्यात आले. दहा गावात हिंडून, महिलांना सकस आहार, बालपोषण, बाल आरोग्य, परसबाग वगैरेसंबंधी माहिती द्यायची असा हा कार्यक्रम. ग्रामीण महिलांसाठी उद्बोधक असे कार्यक्रम अनुताईंनी सुरू केले. यात पदार्थांचे प्रात्यक्षिक, पदार्थांची प्रदर्शने, या विषयाला धरून संवाद, गाणी वगैरे सकस आहाराला पोषक असे प्रशिक्षणाचे कार्यक्रम या ठिकाणी केले जातात. बाल पोषणाबरोबरच, बालसंगोपन, बालसंरक्षण, बालशिक्षण आदि कार्यक्रमही खूप गाजले.

पूर्व प्राथमिक शाळांसाठी आदिवासी मुलांसाठी गाणी, गोष्टी अनुताईंनी लिहिल्या. बालगीतं, बडबडगीतं, सकस आहारगीतं, गंमत जंमत, छोटीशी नाटुकली अशी, बालवाडी आणि प्राथमिक शाळेच्या मुलांसाठी आणि शिक्षकांसाठी अनेक पुस्तके अनुताईंनी लिहिली.

'बालवाडी कशी चालवावी?' या मराठीतील पुस्तकाच्या



आत्तापर्यंत पाच आवृत्त्या निघाल्या आहेत. या शिवाय हिंदी, गुजराथी व इंग्रजी या भाषांतही अनुवाद झाला आहे. पू. ताराबाई मोडक यांच्या सहकार्याने, अनुताईंनी मराठीत 'कुरणशाळा' आणि मराठी व हिंदी भाषेत 'विकासाच्या मार्गावर' ही दोन पुस्तके लिहिली. 'अजब सातामाई' ही बालकथा तर 'टिल्लूची करामत' ही पारितोषिक प्राप्त कथा आहे. 'कोसबाडच्या टेकडीवरून' हे आत्मनिवेदनपर मराठीतील पुस्तक ३१ ऑगस्ट १९८० साली प्रकाशित झालं आणि त्यानंतर अनुताईंनी हाती घेतलेल काम म्हणजे दामोणचा प्रकल्प. 'ठाणे जिल्हा स्त्री शक्ती जागृती समिती' या संस्थेतर्फे डहाणूच्या परिसरातच ६ पाळणाघरे, एक बालवाडी आणि 'सावित्री' नावाचे मासिक व एक मूकबधिर मुलांची शाळा चालते. या संस्थेच्या अध्यक्षा म्हणून अनुताईंनी केलेलं कार्य. या सगळ्यांची नोंद व्हावी हे वेगळ्या प्रकारचे काम समजावे, या दृष्टिकोनातून १७ मार्च १९८४ रोजी, 'कोसबाडच्या टेकडीवरून' या पुस्तकाची, वाढीव पानांची दुसरी आवृत्ती काढण्यात आली. या शिवायची अनुताईंची पुस्तके म्हणजे 'आटपाट नगरात', 'सकस आहारगीते' आणि 'गुरुमाऊलीचा संदेश' हे नाटक. या शिवाय बालवाडीतील गोष्टी भाग १, भाग २ बालवाडीतील बडबडगीते, बालवाडीतील कृतिगीते, प्रबोधिका ही अनुताई वाघ यांनी संपादित केले पुस्तके आहेतच.

नवसाक्षरांसाठी 'सहज शिक्षण' ही एक छोटी पुस्तिका अनुताईंनी लिहिली. 'वडाच्या पारावर', 'आजीबाईचा बटवा', 'शिवबाच्या मळ्यात' अशा शीर्षकांखाली रोजच्या व्यवहारातील उदाहरणे या पुस्तकात सहज संवादशैलीत दिल्याने, शेती, सोनखत, हिरवखत इ. खतांचा वापर, बाजारातील हिशेब, असं जाता जाता सहज शिक्षण या पुस्तकांतून मिळतं.

प्रौढशिक्षण म्हणजे नुसती साक्षरता नव्हे तर आपले जीवन,

आपला समाज या सगळ्यांची ओळख करून देणारे शिक्षण. ते अनौपचारिक म्हणजे सहजच असायला हवे.

'लिहायला वाचायला' येत नाही म्हणजे माणूस डोळे असून आंधळा. हे संवादातून पटले की, मुलांना शाळेत घालायला हवे. एवढेच नव्हे तर मोठ्या वयातही आपण शिकायला हवे. हे पटतं. असं हे प्रौढशिक्षण, सहजशिक्षण असायला हवं. असं अनुताईंनी या पुस्तकात साधार स्पष्ट केलं आहे.

केंद्र सरकार साक्षरता प्रसारार्थ लिहिलेल्या पुस्तकास दरवर्षी रु. १०००/- चा राष्ट्रीय पुरस्कार देते. हा राष्ट्रीय पुरस्कार १९८१ मध्ये अनुताई वाघ यांच्या 'सहज शिक्षण' या पुस्तकास मिळाला.

ग्रामीण बाल साहित्याविषयी विचार मांडताना अनुताई म्हणतात, ''बालसाहित्य म्हणजे बालकांना आवडणारे, समजणारे, झेपणारे आणि विकासाकडे नेणारे साहित्य.''

वास्तविक मुले इथून तिथून सारखीच, मग शहरी-ग्रामीण फरक कशाला?

येथे फरक बालकांमध्ये नाहीतर बालकांभोवती असणारे वातावरण, कुटुंबव्यवस्था, सामाजिक चालीरीती, आर्थिक व औद्योगिक परिस्थिती या सगळ्यांचा भाषेच्या माध्यमातून तर अधिकच होत असतो. या गोष्टी लक्षात घेता, शहरातील मुलांच्या भोवती असणारे सुधारित विज्ञानयुगाचे वातावरण आणि खेड्यातील बालकांच्या भोवती असणारे निसर्गसमृद्ध, पण यांत्रिक युगापासून दूर असे वातावरण यामुळे हा फरक होईलच आणि तो फरक बोलीभाषेत भावभावना प्रकट करणाऱ्या साहित्यात सर्वत्र दिसून येईल.

बालकांना आवडणारे, पेलणारे, विकासाप्रत नेणारे साहित्य त्यांच्या अवतीभवतीच्या परिसरातून निघालेले, त्यांच्या परिसराशी समरस होणारे असे हवे म्हणूनच सगळीकडे एकाच साच्याचे साहित्य



चालणार नाही. उदा. बालभारतीमध्ये 'पंढरपूरची यात्रा' हा धडा छान आहे. पण आपले खेडेगाव सोडून, बाहेरचे जग न पाहिलेल्या आदिवासी बालकांना पंढरीचा विठोबा, त्याच्या नामाचा गजर, त्यात तल्लीन होणं कसं समजणार?

मग जे समजत नाही ते आवडणार कसं? वाचनाची गोडी लागणार कशी?

त्यापेक्षा त्यांच्या गावाजवळ - वाड्याजवळ भरणाऱ्या महालक्ष्मीच्या जत्रेचं. वर्णन त्यांना सांगितलं- वाचायला दिलं- तर ते त्यांना आवडतं. वाचावंसं वाटतं. मग अशी वर्णनपर पुस्तकं या मुलांसाठी वेगळी असायला हवीत. हे अनुताईंचं म्हणणं, आपल्यालाही पटतं.

'आदिवासींच्या घरात काहीच नसते. त्यामुळे त्यांच्या ज्ञानात - माहितीत भर पडेल असे अवतीभवती फार कमी असते. मात्र निसर्ग भरपूर असतो. त्यामुळे समुद्र, प्राणी, पशू, पक्षी- मोटेवरची गाणी- पावसाची गाणी- हे विषय बालकांना जवळचे वाटतात. या भोवतालच्या अनुभवातून- निरीक्षणातून ते हळूहळू लिहू लागतील- वाचू लागतील.

'पाऊस आला रे आला

आम्हाला आनंद झाला...' अशी एक मोठी कविता या अदिवासी मुलांना शिकवली होती. एका वर्षी पाऊस खूप खूप पडला- मग एका मुलीने सहजच कविता लिहिली-

'पाऊस आला रे आला

आम्हाला कंटाळा आला...'

स्वतःच्या भावना शब्दांमध्ये व्यक्त करण्याची तिची मानसिक तयारी आपोआप झाली.

अनुताई आदिवासी बालकांच्यात काम करीत असल्याने

त्यांच्या जीवनातून, त्यांना सहज समजतील- वाचाव्याशा वाटतील- अशाच साहित्यकृती त्या लिहितात- उदा.

'खणखण कुदळी..'

'बकरी बाई-बकरी बाई...'.

बालकांच्या विकासात- अशा परिसरातून निर्माण झालेल्या बालसाहित्याला महत्त्वाचे स्थान मिळणार आहे, बालमान्यता मिळणार आहे.

या खेडेगावातील मुलांची भाषा जशी ग्रामीण आहे. तशीच ठेवावी. पण थोडी सुधारित पुस्तकेही असावीत- मधूनमधून त्या भाषेतील परिचयात्मक शद्ब, वाक्प्रचाराचा उपयोग करावा. तसेच सरळ सोप्या भाषेतील , सुधारित भाषेतील साहित्यही मुलांना वाचायला द्यावे. असे अनुताईंना वाटते. उदा.-

बाबा काय करतो?-

डोंगराला जाऊन लाकडे आणतो.

आई काय करते?

डोंगराला जाऊन पाने आणते.

वनशा काय करतो?

झोपडी शिवतो. (झोपडी शिवतो म्हणजे दुरुस्त करतो.)

वनशी काय करते?

पाणी आणते.

दादू काय करतो?

मातीत खेळतो. (दादू म्हणजे लहान मूल)

'झोपडी शिवणे', 'दादू' - असे दोनच शद्ब वारली भाषेतील आहेत. पण त्यामुळे हा धडा वारली मुलांना जवळचा वाटतो. म्हातारी म्हणायच्याऐवजी 'वाडघीण' म्हटले की त्यांना आवडते. हळूहळू ती शुद्ध स्पष्ट उच्चार करू लागतात.



खेड्यातील या मुलांत अभिनयकलाही चांगली असते. एकूण काय तर ग्रामीण जीवनाशी मिळते-जुळते, सोप्या भाषेतले पण प्रासादयुक्त असे बालसाहित्य लिहिले जावे. लोक गीते, लोककथा यांचाही उपयोग करावा. असे अनुताईंना वाटते.

यावरून ग्रामीण बाल साहित्य -विकासासाठी आदिवासी बाल विकासासाठी, किती सर्वांगीण विचार अनुताईंनी केला आहे- हे आपल्याला पटते.

मुलांना काही संदेश सांगणार का? असं विचारल्यावर अनुताई म्हणाल्या,-

'मुलांपेक्षा- मुलांच्या पालकांना मला काही सांगावंसं वाटतंय. अडीच-तीन वर्षांच्या, बालवाडीतील मुलांना अक्षर-ओळख, अभ्यास शिकविण्याची घाई पालकांनी करू नये आणि तसा आग्रह शिक्षकांनी करू नये. मुलांच्या कुवतीचा, मानसिक वाढीचा विचार व्हायला हवा.'

'कामातील बदल म्हणजे सुट्टी किंवा आनंद'- ही अनुताईंची धारणा आहे. त्यामुळे वय पुढे सरकत असलं तरी त्यांचं मन मात्र नव्या नव्या प्रकल्पाची आव्हानं स्वीकारीत असतं.

आणि म्हणूनच वयाच्या ७२ व्या वर्षी अनुताईंनी आणखी एक नवा प्रयोग सुरू केला आहे. डहाणूला मुक्या-बहिऱ्यांसाठी शाळा आणि वसतिगृह सुरू केलं आहे, तर वयाच्या ७५ व्या वर्षी, ठाणे जिल्ह्यातील, डहाणू तालुक्यातील,- दामोण-ऐने- या गावी 'ग्राममंगल' हा प्रकल्प हाती घेतला आहे.

'ग्राममंगल' मध्ये नेहमीची पाठ्यपुस्तके बाजूला ठेवली आहेत व या ग्रामीण भागातील इयत्ता पहिली-दुसरीच्या विद्यार्थ्यांसाठी स्वत:ची नवीन वेगळी पुस्तके तयार केली आहेत. हा 'ग्राममंगल' चा प्रकल्प म्हणजे ग्रामीण शिक्षणाची शाळा- प्रयोगशाळाच म्हणायला हरकत नाही. इथे एक मुक्त प्राथमिक शाळा, चार बालवाड्या, चार

पाळणाघरं आहेत. इयत्ता ४थी नंतर मात्र नेहमीचा अभ्यासक्रम दिला जातो.

मुक्त शाळेत मुलांना पाट्या-पेन्सिली देण्याची गोष्ट निघाली तर मुले म्हणाली- पाटी-पेन्सिल कशाला?

नदीवरचे काळेभोर चपटे दगड घेऊन आली आणि म्हणाली- 'ह्या काय पाट्या- पुष्कळ आहेत.' पुन: धावत नदीवर गेली आणि ठिसूळ दगड घेऊन आली आणि त्याने या नव्या शोधलेल्या पाटीवर चित्रे काढू लागली. अशी ही दिलं तर घेणारी- साधी शिकणारी आदिवासी मुलं. पाट्या मिळाल्या तरी, गावात पोट भरायचे साधन नाही. त्यामुळे या कातकरी आदिवासी मुलांच्या शिक्षणाचा उत्साह किती दिवस टिकणार? ही भीती सर्व कार्यकर्त्यांना आहेच. या दामोण भागात जंगल आहे. गवती जमीन आहे. तेव्हा त्या संबंधातील उद्योग सुरू करायला हवेत. उदा. विटांच्या भट्ट्या घालणे, सुतारी काम सुरू करणे, पाने, फुले बिया गोळा करून विकणे, सामाजिक वनीकरण करणे, औषधी वनस्पतींचे बगीचे लावणे- अनेक प्रकल्प.

विचार खूप आहेत. पण ते प्रत्यक्षात आणण्यासाठी पैशाचे पाठबळ हवे. हे उद्योगवर्ग चालविण्यासाठी, गावाची समस्या समजून घेणारे, पोटापुरत्याच मानधनाची अपेक्षा असणारे निरपेक्ष कार्यकर्ते हवे आहेत. हे काही एकट्या अनुताईंचे काम नाही.

वय आणि कार्यबाहुल्य यामुळे अनुताई आता फक्त देखरेख आणि मार्गदर्शन करतात. काळ पुढे सरतो आहे. एकेक अवयव कुरकुरतो आहे. शरीर अधू, अपंग झाले आहे. पण मन-मनाची उमारी ती अजूनही चिरतरुण आहे. नुकताच १९ एप्रिल १९९२ रोजी ताराबाई मोडक यांचा जन्मशताब्दी समारंभ कोसबाडला मोठ्या प्रमाणावर साजरा करण्यात आला. त्याची आखणी, मार्गदर्शन आणि संयोजन सगळं काही अनुताईंनी आपल्या सहकाऱ्यांसह व्यवस्थित



पार पाडले.

समाजसेवेने प्रेरित झालेल्या अनुताई जिद्दी आहेत. स्वतंत्र विचारांच्या आहेत. तसे प्रश्न सततच उभे राहिले पण अनुताईंनी कधी कुरकुर केली नाही की कुणाला दोष दिला नाही. तो त्यांचा स्वभावच नाही. जे कार्य हाती घेतलं ते निष्ठेने, चोख पार पाडायचे ही त्यांची वृत्ती आहे. त्यामुळे क्वचित कार्यपूर्तीसाठी 'कडक' पणाही स्वीकारावा लागला. तो त्यांनी स्वीकारला.

सामाजिक बदलाकडे त्या डोळसपणे पाहत आहेत. आज साहित्यिक अभिरुचीचे वळण बदलते आहे. आपल्यापरीने अल्पजीवी प्रयत्न म्हणून त्या 'सावित्री' मासिकाचे कार्य करीत आहेत. या संदर्भात अनुताई म्हणतात- ''आमच्या पुराणातील सावित्रीने यमराजापासून आपला पती परत मिळविला. आमच्या पृथ्वीवरील सावित्रीने स्त्री-शिक्षणास सुरुवात करून, प्रचलित सामाजिक रूढीला धक्का दिला. माझे 'सावित्री' मासिकही असेच काही करू इच्छिते. समाजकार्यकर्त्या, सुशिक्षित, सुसंस्कारी अशा भगिनी- अगदी गरिबीमध्ये जीवन कंठूनही आपल्या घरादाराला पुढे आणणाऱ्या भगिनी,- समाजातील उपेक्षित भगिनी-' अशा अनेक प्रकारच्या भगिनींच्या जीवनकथा ग्रंथित करण्याचे भाग्य 'सावित्री' ने मला दिले.''

खेडेगावातील महिलामंडळे कशी चालवावीत- हे दाखविणारे 'मंगलचे महिलामंडळ' क्रमश: 'सावित्री' मध्ये येत होते. आता ते पुस्तकरूपाने प्रकाशित झाले आहे.

याशिवाय श्रीलक्ष्मीचॅरिटेबल ट्रस्टतर्फे पाली या गावी 'मंगलधाम' ही योजना चार एकर जागेत सुरू होत आहे. याठिकाणी परित्यक्ता ताईमाईंसाठी नर्सिंग, शिक्षकी प्रशिक्षण देण्यात येणार आहे. नकोशा आजी-आजोबांसाठी, मायळतीचे आश्रयस्थान- वृद्धाश्रम

काढण्यात येणार आहे, तर टाकलेल्या अनाथ बाल-गोपालांसाठी बालकाश्रम काढण्यात येणार आहे. असा हा त्रिसूत्री- समन्वयी संकल्प आहे. माणुसकीचे नवे संबंध निर्माण करण्याचा प्रयत्न आहे.

अदिवासी भागातील बालकांविषयी वाटणारे वात्सल्य, दुःखी असहाय महिलांविषयीची वाटणारी नितांत कळकळ, प्रेम, आपलेपणा आणि कर्तव्यावरील नितांत निष्ठा, नवनवीन शैक्षणिक प्रयोग करून पाहण्याची हौस- यातूनच हे बालशिक्षणाचे, आदिवासी विकासाचे कार्य चालू आहे. हे कार्य करीत असताना पू. ताराताई मोडक यांचे ऋण त्यांच्या सतत स्मरणात असते. आयुष्यात जेव्हा जेव्हा अडचणी आल्या तेव्हा तेव्हा अनुताईंना पू. विनोबा भावे यांच्या 'गीता-प्रवचने' या ग्रंथाचा आधार वाटतो. 'ईश्वरी संकल्प होता म्हणून माझ्या हातूनही थोडीफार समाजसेवा घडली'. असं नम्रपणे त्या नमूद करतात.

शिक्षणक्षेत्रातील त्यांच्या या सर्व कार्याची सरकार दरबारीही नोंद झाली आहे.

महाराष्ट्र राज्य राज्यपालांच्या हस्ते १९७२ मध्ये 'आदर्श शिक्षिका' म्हणून पारितोषिक.

महाराष्ट्र राज्यपालांच्या हस्ते १९७५ मध्ये 'दलित-मित्र' ही पदवी.

१९७८ मध्ये महाराष्ट्र विज्ञान परिषदेचे पारितोषिक व मानपत्रिका.

१९७८ मध्ये इचलकरंजी येथे 'फाय फाऊंडेशनचे' रु. १०,०००/- चे पारितोषिक आणि मानपत्रिका.

आंतरराष्ट्रीय बालक वर्षात, १९७९ मध्ये, सर्वोत्तम बालकल्याणाचे काम करणाऱ्या व्यक्तीस दिले जाणारे, रुपये २०,०००/- चे पारितोषिक - भारताच्या उपराष्ट्रपतींच्या हस्ते



देण्यात आले, परंतु ताराताईंनी मात्र अनुताईंना त्याहीपूर्वी आपला 'मुलगा' म्हणून गौरविले होते.

आदिवासी मुलांचे शिक्षण आणि कल्याण या बाबतीत ३५ वर्षापेक्षा कितीतरी जास्तकाळ कार्यरत राहिल्याबद्दल ३१ ऑगस्ट १९८० रोजी, त्यांच्या वयाच्या ७१ व्या वर्धापनादिनी, बोर्डी येथे, सार्वजनिक सभेत, अनुताईंना मानपत्र व एकलक्ष रुपयांचा निधी अर्पण करण्यात आला.

१९८० मध्येच, ठाणे येथील डॉ. बेडेकर विद्यामंदिरातील विद्यार्थ्यांतर्फे भव्य सत्कार व १०७५/- रुपयांची थैली अर्पण करण्यात आली.

पुण्याच्या 'मातुःश्री माईसाहेब पारखे स्मृतिन्यास' च्या वतीने 'आदर्श माता' (महिला)- म्हणून १२ डिसेंबर १९८० मध्ये पुण्यात प्रकट सन्मान.

डिसेंबर ८० मध्येच मुंबईच्या 'विवेकानंद' क्लासेसतर्फे रु. १०,०००/- देऊन प्रगट सत्कार.

मुंबई महापालिकेच्यावतीने, डिसेंबर ८० मध्ये झालेला प्रगट सन्मान.

आदिवासी बालके आणि आदिवासी महिला यांच्यासाठी नेत्रदीपक शैक्षणिक कार्य केल्याबद्दल, पुणे येथे महाराष्ट्रातील अनेक संस्थांच्या वतीने झालेला आणि दिल्ली येथे झालेला गौरव समारंभ.

महाराष्ट्र राज्याच्या मुख्यमंत्र्यांच्या हस्ते जानेवारी १९८१ मध्ये, रु. ५०००/- चा, कै. सावित्रीबाई फुले स्मृतिप्रित्यर्थ दिला गेलेला 'सावित्रीबाई फुले पुरस्कार' प्रथमच या वर्षी देण्यात आला आणि पहिला पुरस्कार अनुताईंना मिळाला.

आयुर्विमा कार्पोरेशनच्या (महामंडळ) ग्राहक संघाच्या वतीने रु. ५०००/- देऊन झालेला गौरव.

'सहज-शिक्षण' या अनुताईंनी लिहिलेल्या पुस्तकास १९८१ मध्ये रु.१०००/- चा राष्ट्रीय पुरस्कार मिळाला. प्रौढ साक्षरता प्रसारार्थ लिहिलेल्या पुस्तकास केंद्र सरकारकडून हे पारितोषिक देण्यात येते.

डहाणू जेसीस कनफर्सतर्फे १८-९-९२ रोजी 'Outstanding elder citizen of Dahanu.म्हणून सत्कार करण्यात आला.

१९८२ हे year of the elder म्हणून घोषित करण्यात आले होते. त्यानुसार हा अनुताईंचा सत्कार करण्यात आला. आणि सगळ्यात मानाचा तुरा म्हणजे - २६ जाने १९८५ रोजी भारत सरकारकडून अनुताईंना 'पद्मश्री' हा किताब देऊन गौरविण्यात आले.

१९८५ मध्येच एक लाख रुपयांचा श्रीमती जानकीदेवी बजाज राष्ट्रीय पुरस्कारही अनुताईंना प्राप्त झाला. नुकताच म्हणजे एप्रिल १९९२ मध्ये, सेवाभावी संस्थेला दिला जाणारा आशा भोसले पुरस्कारही अनुताईंना मिळाला आहे.

अनुताईंना पारितोषिके मिळाल्यानंतर, त्यांनी ती सर्वच्या सर्व संस्थेला देणगी म्हणून संस्थेच्या स्वाधीन केली. याव्यतिरिक्त अनुताईंनी सन्मानपूर्वक अनेक पदे भूषविली आहेत.

कार्यकारिणी समासद- नॅशनल कौन्सिल ऑफ एज्युकेशन रिसर्च अँड ट्रेनिंग, दिल्ली. (N.C.E.R.T.)

जनरल सेक्रेटरी - नूतन बाल शिक्षण संघ.

उपाध्यक्ष- इंडियन असोसिएशन ऑफ प्री स्कूल एज्युकेशन.

समासद- नवी दिल्ली येथील आय. सी. सी. डब्ल्यू. बालसेविका ट्रेनिंग अॅडव्हायसरी कमिटी.

अध्यक्ष- स्त्री शक्ती- जागृती समिती, ठाणे.

समासद- रिसर्च एज्युकेशन बोर्ड ऑफ दि स्टेट इन्स्टिट्यूट



ऑफ एज्युकेशन- (महाराष्ट्र राज्य)

समासद- राज्यपातळीवरील प्रौढ साक्षरता कमिटी.

समासद- आंतरराष्ट्रीय बालकवर्षातील जिल्हा समिती आणि विभागीय समिती.

संपादिका- १)'शिक्षणपत्रिका' मासिक. २)'सावित्री' मासिक.

ज्यांच्यासाठी हे कार्य केले- त्या आदिवासी कार्यकर्त्यांची एक फळी कोसबाडला आता तयार झाली आहे. ही अनुताईंच्या कार्याला मिळालेली खरी पावतीच आहे.

ताया वाढाण ही आदिवासी- बालवाडी शिक्षिका आहे, तर सुंदर वाढाण ही प्रशिक्षित बालसेविका आहे. शिवाय पंचायतीची समासदही आहे. बाबूराव वाघ या अनुताईंच्या विद्यार्थ्याने S.S.C. नंतर कृषि शिक्षणाचा दोन वर्षांचा अभ्यास पूर्ण केला आहे. तीन वर्षे डहाणू तालुका पंचायतीच्या सभापतीची जागा त्यांनी भूषविली आहे. श्री. मुजड हे M.A.M.Ed. असून, कृषि शिक्षण संस्थेच्या शिक्षण केंद्राचे मुख्य आहेत. श्री. अर्जुन उराडे- M.SC. आहेत, तर एक विद्यार्थी गुरांचा डॉक्टर आहे. काही यशस्वी शिक्षक, कुशल कारागीर बनले आहेत तर काही दुकानदारही झाले आहेत.- ही सगळी मंडळी अनुताईंना पुत्रवत वाटतात.

अनुताईंची ही माणूस घडविण्याची धडपड बोर्डी- कोसबाडला आजही अव्याहत चालू आहे. चालू राहणार आहे. कारण कच्चे मडके घडविण्यात अनुताई हुशार आहेत. शरीराने ८२ पावसाळे सोसले आहेत. तसेच अनुभवाची ठेवही गाठीशी भरपूर आहे.

याच आधारावर आता अकरा बालवाड्या, एक D.Ed.-अध्यापक विद्यालय, अंगणवाडी प्रशिक्षण केंद्र, मूकबधिर विद्यालय-वसतीगृह- ग्राममंगल योजना आणि इतर अनेक कार्यशाळा- अशा अनेक गोष्टींचा प्रचंड डोलारा उभा आहे. खऱ्या अर्थाने

अनुताईंचा समाज-शिक्षणसंसार सुफळ संपूर्ण झाला आहे.

मंगला गोखले.

असं वर्तमानात मी तुमच्याशी बोलते आहे, लिहिते आहे. तोच रविवार दि. २७ सप्टेंबर १९९२ रोजी सकाळी ७.४५ च्या सुमारास वृद्धापकाळाने कोसबाड येथे, या थोर आदिवासी समाजसेविका, शिक्षणतज्ज्ञ अनुताई वाघ यांचे निधन झाल्याची दुःखद बातमी आली.

शिक्षणाद्वारे आदिवासींच्या जीवनात जागृती निर्माण करण्याचे महान कार्य त्यांनी केले. शिक्षणक्षेत्रातील असे हे एक भारदस्त व्यक्तिमत्त्व आता काळाच्या पडद्याआड गेले आहे.